श्री

संगीत

# सा व का र

लेखक—

वामन राजाराम टिपणीस

'...मत्याग' (नाटक), 'गृहदेवता' (नाटिका), 'विनोद-मंजूषा'
(विनोदी लेख) इत्यादि पुस्तकांचे कर्ते.



आवृत्ती १ ली.

सन १९३५

किंमत आठ आणे.

प्रकाशकः—

अनंत गणेश देशमुख
छपरा बिल्डिंग, लेडी जमशेटजी रोड,
दादर, मुंबई.



सावकार नाटकाचा प्रथम प्रयोग मुंबई येथें बॉम्बे थिएटरमध्यें रविवार तारीख ६ जानेवारी १९३५ रोजीं दिवसा ३–३० वाजतां चित्तरंजन–नाट्य–समाजाकडून करून दाखविण्यांत आला.



मुद्रकः—
पांडुरंग महादेव भागवत
मौज प्रिंटिंग ब्युरो,
खटाववाडी, गिरगांव,
मुंबई.

नाट्य, काव्य आणि विनोद ह्या तिन्ही प्रांतांत
अलौकिक प्रतिभेनें चमकून अल्पकाळांतच
दिवंगत झालेले

# राम गणेश गडकरी

ह्यांच्या पूज्य स्मृती-समाधीला हें नाट्य-पुष्प
भक्तिभावानें अर्पण केलें आहे.

वा. रा. टिपणीस.

# नान्दी.

नाट्य-कथानक प्रेक्षकांचें भरपूर मनोरंजन करणारें व नटांना अभिनय-कौशल्य दाखविण्यास मुबलक वाव देणारें असें असावें अशी माझी विचारसरणी आहे व उच्च प्रकारची करमणूक हा नाटकाचा मुख्य उद्देश असावा असें माझें मत आहे. त्या मताला अनुसरून प्रस्तुतच्या सावकार ह्या नाटकाची रचना केली आहे. सदहू नाटक अर्धवट लिहिलेल्या स्थितींत बराच काळ पडून राहिलें होतें; तें संपूर्ण होऊन रंगभूमीवर येत आहे ह्याचें श्रेय चित्तरंजन-नाट्य-समाजाचे डायरेक्टर श्रीयुत विठोबा वासुदेव झावबा ( देसाई ) ह्यांना आहे. श्रीयुत विठोबा आणि चित्तरंजन-नाट्य-समाजाचे इतर सभासद ह्यांनीं हें नाटक पुरें करण्याबद्दल माझा इतका पाठपुरावा घेतला कीं, त्यांच्या शब्दाला पाठ फिरवणें अशक्य होऊन मला हें नाटक पुरें करणें भागच पडलें. चित्तरंजन समाजाच्या चालकांनीं आणि नटांनीं ज्या प्रेमानें आणि उत्साहानें माझें आत्मत्याग नाटक रंगभूमीवर आणलें त्याच प्रेमानें आणि उत्साहानें ह्याहि नाटकाची सजावट केली ह्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. माझे कवि-मित्र श्रीयुत श्रीकृष्ण गोविंद देशपांडे ह्यांनीं माझ्या विनंतीला मान देऊन ह्या नाटकांतील पदें करून दिलीं ह्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

मौज-प्रिंटिंग-ब्यूरोचे मालक श्रीयुत भागवत व मॅनेजर श्रीयुत जोशी ह्यांनीं पुस्तक छापण्याच्या बाबतींत जें सहाय्य केलें त्याबद्दल त्यांचे आभार मानणें अवश्य आहे; त्याचप्रमाणें माझ्या लेखनकार्याला सतत प्रोत्साहन देणारे माझे प्रेमळ मित्र श्रीयुत केशव सखाराम मथुरे व श्रीयुत बाळासाहेब ऊर्फ बाळकृष्ण गोपाळ विचारे ह्यांनीं सदहू नाटकाबद्दल जें आपुलकीचें अगत्य दाखविलें त्याबद्दल मी त्यांचा कायमचा ऋणी आहे.

दाऊद-बाग; अंधेरी.
ता. १ जानेवारी १९३५.

वा. रा. टिपणीस.

॥ श्रीराम प्रसन्न ॥

# सावकार

## अंक पहिला.

### प्रवेश १ ला.

पद १ ( ईश-स्तवन )

**प्रभुवरा नत पदीं लीन ह्या । आशिर्वच शुभ दे पतिता या ॥ धृ ॥**
**विकार लहरी स्वैर उसळतां । तूंच एक वा त्यां शमवितां ॥ १ ॥**

( हॉल. भय्यासाहेब पेपर वाचीत बसले आहेत. )

**भय्यासाहेब**—छेः! ह्या स्ट्राईकसनीं तर माझं डोकं फिरून जाण्याच्या बेतांत आलं आहे. आज अमक्या मिलमधील मजूर स्ट्राइकवर गेले, तर उद्यां त्या कारखान्यांतील लोकांनीं संप केला अशी रोज कांहींना कांहींतरी बातमी आहेच. हे लेबरर्स म्हणजे मोठा नुइसन्स (Nuisance) झाला आहे. तें कांहीं नाहीं, असा कायदा केला पाहिजे, कीं जे कोणी मजूर संप करतील, त्यांना एकदम जन्मठेप काळें पाणी ! ह्या ठिकठिकाणच्या संपाच्या बातम्या ऐकून आमच्या कारखान्यांतील लोकांची डोकीं पिसाळतात कीं काय, अशी मला भीति पडली आहे. पण माझ्या कारखान्यांतील लोकांना संप तर करूं द्या, कारखाना साफ बसून गेला तरी हरकत नाहीं, पण त्याची कोणतीही मागणी मी यत्किंचित सुद्धां मान्य करणार नाहीं.

( कारखान्याचे मॅनेजर कृष्णराव कांहीं कागदपत्रें घेऊन येतात व भय्यासाहेबांची त्यावर सही घेतात. )

**कृष्णराव**—आजचा सूर्योदय आपण पाहिला का ?

**भय्यासाहेब**—का ? ! आजचा सूर्योदय ? आणि तो पाहण्याची काय आवश्यकता ? आजच्या सूर्याचा रंग काह निराळा होता ? पण सूर्योदयापूर्वी उठण्याला, मी एखादा भिकारडा मजूर आहे ? कां एकादा खर्डेघाश्या कारकून आहे ?

कीं भवति भिक्षान् देहि करणारा एकादा भिक्षुक आहे ? सूर्यानं नेत्र उघडल्या-नंतरच आम्हीं श्रीमंत लोक आपले डोळे उघडतों, हें तुम्हांला अद्यापि माहीत नाहीं ? Don't ask me such silly questions again.

कृष्णराव—आजचा सूर्योदय म्हणजे "सूर्योदय" दैनिकाचा आजचा अंक, असा माझ्या म्हणण्याचा अर्थ. सूर्योदय हें नवीन निघालेलें दैनिक आपल्याला माहीत असेलच !

भय्यासाहेब—डॅम् दॅट युवर दैनिक ॲण्ड डॅम् दॅट युवर सूर्योदय ! I never care to read your rubbish vernacular papers.

कृष्णराव—आपल्याला कंटाळवाणा वाटणारा हा विषय अधिक वाढविण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. पण आपल्या कारखान्याशीं हितसंबंध असलेल्या एका गोष्टीचा ह्या पत्रांत उल्लेख आहे. देशी भाषेंत लिहिलेला मजकूर वाचल्यानं साहेबांच्या दृष्टीला धक्का बसण्याचा संभव असल्यास मी वाचून दाखवितों, साहेबानीं ऐकण्याची मेहरनजर करावी.

भय्यासाहेब—काय हकीकत असेल, ती थोडक्यांत सांगा. वाचून दाखविण्याची मुळींच जरूर नाहीं. तुम्हांला वाचता येतं हें मला ठाऊक आहे.

कृष्णराव—जशी साहेबाची आज्ञा. आपले मधुकरराव ह्यांनीं काल कारखान्यांतील मजूरांसमोर व्याख्यान दिलं !

भय्यासाहेब—काय ? मधुकरनं व्याख्यान दिलं ? आणि व्याख्यानाचा विषय ?

कृष्णराव—"मजुराचे हक्क" हा विषय होता !

भय्यासाहेब—काय ? मजुराचे हक्क ! What nonsense is this ? I must put a stop to this mischief immediately. कृष्णराव, मधुकरला मी तावडतोब बोलावलं आहे म्हणून सांगा. आणि तुमचं काम नसल्यास तुम्हीं जा. ( कृष्णराव जाऊं लागतो ) कृष्णराव !

कृष्णराव—सर

भय्यासाहेब—तें तुमचं वर्तमानपत्र इकडे द्या, आणि तुम्ही चालू लागा. ( कृष्णराव वर्तमानपत्र देऊन जातो. )

मधुकर—( प्रवेशून ) आपण मला बोलावणं पाठविलं ?

**भय्यासाहेब**—होय, ह्या पत्रांत " मजुरांचे हक्क " ह्या विषयावर जें व्याख्यान आलं आहे, तें आपलंच का ?

**मधुकर**—होय, माझंच.

**भय्यासाहेब**—अस्सं ! आपली विद्वत्ता बरीच वाहूं लागली एकूण ! आपण आपल्या अकलेचे असे तारे तोडाल अशी माझी कल्पना नव्हती. मधुकर, मी तुला निक्षून सांगतो कीं तुझं हें वर्तन मला बिल्कूल खपणार नाहीं.

**मधुकर**—पण माझ्या हातून असं झालं तरी काय ?

**भय्यासाहेब**—काय झालं ? काय झालं नाहीं असं विचार. घराला आणि कारखान्याला प्रत्यक्ष आग लागण्याची बाकी राहिली आहे. मधुकर, तुमच्यासारखे बेजबाबदार लोक अशिक्षित मजुरांच्या टाळक्यांत अशा आगलाव्या कल्पना जर कोंबूं लागले, आणि त्यामुळें उद्यां जर त्यांचीं माथीं पिसाळलीं, तर आमच्या कारखान्याची काय वाट होणार ? आज इतकीं वर्षे सतत परिश्रम करून रक्ताचं पाणी करून जो कारखाना एवढा भरभराटीस आणला त्याचा पार धुव्वा उडून जाईल, आणि मला एकाद्या कंगालाप्रमाणं दारोदार भीक मागण्याचा प्रसंग येईल. समजलास ? आणि ह्मणे काय झालं !

**मधुकर**—माझ्या व्याख्यानानं असा भयंकर प्रसंग ओढवेल असं मला मुळीच वाटत नाहीं. आपण केवळ कल्पनेनं हें भेसूर चित्र निर्माण केलं आहे. मी फक्त मजुरांचे हक्क ह्याविषयीं दोन शब्द बोललों.

**भय्यासाहेब**—पण मी विचारतों, कसले मजुरांचे हक्क आले आहेत रे ? आजकाल ह्या हक्कांच्या हाकाटीनं मस्तक भडकण्याची वेळ आली आहे. स्त्रियांचे हक्क ! मुलांचे हक्क ! नोकरांचे हक्क ! मजुरांचे हक्क ! भिकाऱ्यांचे हक्क ! जो उठला तो हक्कदार. त्या हक्काच्या हाकाटीनं, मी तर थक्क होऊन गेलों आहें. मला आतां भीति पडली आहे कीं, उद्यां आमच्या तबेल्यांतील घोड्यांचं डेप्युटेशन हक्काच्या मागणीकरितां आमच्याकडे येतें कीं काय ? मधुकर, मी पुन्हां विचारतों, कसले आले आहेत मजुरांचे हक्क ?

**मधुकर**—भय्यासाहेब, कारखान्यांचे मालक ज्या संपत्तीवर मनमुराद चैन करतात, ती संपत्ती उत्पन्न करण्याकरितां जो मजूर सारखा राबत असतो. त्या मजुराला जिविताला अवश्य असणाऱ्या वस्तूंची उणीव भासणार नाहीं इतके तरी हक्क मिळायला नकोत का ?

**भय्यासाहेब**—पण इथं हक्काचा काय संबंध ? मजूर काम करतो, आणि त्याबद्दल त्याला मजुरी मिळते. आणि मजुरी मिळाली, कीं त्याच्या खाण्यापिण्याची व्यवस्था आपोआपच होते.

**मधुकर**—मजूर काम करतो आणि त्याला मजूरी मिळते ही गोष्ट खरी आहे, पण त्याला मजुरी मिळाली कीं त्याच्या खाण्यापिण्याची व्यवस्था आपोआप होते हें मात्र खरं नाहीं. मजुराला जी मजुरी आपण देतां ती त्याच्या कुटुंबाच्या पोषणाला पुरेशीं आहे किंवा नाहीं ह्याचा आपण कधीं विचार केला आहे का ? आपले मजूर ज्या जागेंत राहतात, ती जागा त्यांना आरोग्याच्या दृष्टीनं हितावह आहे किंवा नाहीं ह्याचा आपण कधीं विचार केला आहे का ? आपले मजूर आजारी पडले असतां त्यांना औषधपाणी मिळण्याची व्यवस्था होते किंवा नाहीं ह्याबद्दल आपण कधीं काळजी घेतली आहे का ?

**भय्यासाहेब**—Nonsense ! This is sheer nonsense ! तुझ्या ह्मणण्याप्रमाणं वागायचं, ह्मणजे मजुरांना रोज चमचमीत मिष्टान्नं मिळतील असा भक्कम पगार द्यायला पाहिजे, त्यांना राहण्याला उत्तम हवेशीर हवेल्या बांधून दिल्या पाहिजेत, आणि त्यांना फिरण्याकरितां गाडीघोड्यांची तरतूद करून ठेवली पाहिजे, असंच कीं नाहीं ?

**मधुकर**—आपण माझ्या ह्मणण्याचा विपर्यास करतां. माझं ह्मणणं एवढंच, कीं मजुरांना त्यांच्या जीविताला आवश्यक एवढ्या तरी साधनांची तरतूद त्यांच्या मालकांनीं करून देणं हें त्यांचं कर्तव्यकर्म आहे.

**भय्यासाहेब**—कसलं आलं आहे कर्तव्यकर्म ? माझं कर्तव्यकर्म काय आहे हें मला पूर्णपणं माहीत आहे. At least from you I don't-want to take lessons, on कर्तव्यकर्म. हे पहा. मधुकर, मी तुला एकदांच पण कायमचं सांगतों कीं, तुझं हें हल्लीच वर्तन मला बिल्कूल पसंत नाहीं. तुला जर ह्या घरांत राहावयाचं असेल, तर तूं माझ्याच तंत्राप्रमाणं वागलं पाहिजे. मधुकर, तूं एक निराश्रित मुलगा होतास हें लक्षांत ठेव. लहानाचा मोठा तुला मीं केला, माझ्या स्वतःच्या मुलाला दिलं असतं असं शिक्षण मीं तुला दिलं. मला एकुलती एक मुलगी आहे, मालतीच्या आणि तुझ्या परस्पर भावना काय आहेत ह्याविषयीं मी आंधळा नाहीं, ह्याबद्दल तुझी खात्री असूं दे. मधुकर, तुझा भावी आयु-

न्यकाल सौख्यांत जावा अशी जर तुझी इच्छा असेल, तर ह्यापुढं तूं माझ्य इच्छेविरुद्ध काडीभरही वागतां कामा नये.

**मधुकर**—भय्यासाहेब, आपण माझं संगोपन करून पोटच्या मुलाप्रमाणं वागविलंत, अत्युत्तम असं शिक्षण दिलंत, ह्याबद्दल मी आपला सर्वतोपरी ऋणी आहे. आपले उपकार माझ्या हातून फिटणं कधींही शक्य नाहीं. माझा भावी आयुष्यक्रम सुखांत घालवायचा असेल, तर आपल्या म्हणण्याप्रमाणं मला आपल्य मर्जीप्रमाणं वागलं पाहिजे, पण मी कसं वागावं अशी आपली मर्जी आहे ?

**भय्यासाहेब**—ऐक, पहिल्याप्रथम तूं मजूर आणि मजूरांचे हक्क ह्या बाष्कळ कल्पना पार झुगारून दिल्या पाहिजेत आणि माझ्या कारखान्याची भरभराट कशी होईल एवढया एकाच गोष्टीकडे तूं आपल्याला सर्वस्वी वाहून घेतलं पाहिजे.

**मधुकर**—भय्यासाहेब, आपले माझ्यावर अगणित उपकार आहेत हें मी आपल्याला आतांच सांगितलं. आपले माझ्यावर फेड न होणारे असे उपकार आहेत, म्हणून मी आपल्या मर्जीचा दास बनावं, आपल्या इच्छेला माझा स्वतःचा बळी द्यावा, हें मला उचित दिसत नाहीं. आपल्या इच्छेहून उच्चतम अशी दुसरी एक श्रेष्ठ शक्ती आहे, ती शक्ती म्हणजे माझं मन, माझी सदसद्विवेकबुद्धि. प्रत्येक मनुष्यानं जर प्रथम कोणाची आज्ञा पाळायची असेल, तर त्यानं त्याच्या अंतःकरणांत जागृत असलेल्या ह्या परमेश्वरशक्तीची आज्ञा पाळली पाहिजे. भय्यासाहेब, माझी अंतरींची हांक आपल्या मर्जीप्रमाणं बिल्कूल न वागण्याबद्दल मला बजावून सांगत आहे, तेव्हां निरुपायास्तव मला आपली आज्ञा पाळतां येत नाहीं, ह्याबद्दल दिलगिरी वाटते.

**भय्यासाहेब**—Hold your tongue मधुकर ! ती तुझी सदसद्विवेकबुद्धि, मनोदेवता आणि ती परमेश्वरी शक्ति, ह्यांचं प्रदर्शन माझ्यापुढं करूं नको. **I don't want to hear anymore nonsense from you.** तूं इतका नीच कृतघ्न असशील अशी मला कल्पना नव्हती. तुझ्या मनोदेवतेनं माझ्या इच्छेप्रमाणं बिल्कुल वागूं नको असं तुला बजावून सांगितलं आहे काय ! मग आतां मी तुला काय बजावून सांगतो तें नीट ऐक. मधुकर, आजपासून तूं मालतीशींच नव्हे, तर ह्या प्रांतीच कोणाशीं

कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवतां कामा नये. चोवीस तासांच्या आंत तुला ह्या घरांतून बाहेर पडलं पाहिजे. ह्याउप्पर तुला इथं येण्याला कायमचा-मज्जाव आहे हें ध्यानांत धर. मला आतां तुझं थोबाड मुळींच पाहायला नको. get you gone ( भय्यासाहेब रागानं आंत जातो. )

**मधुकर**—( स्वगत ) केव्हांना केव्हां तरी एकदां हा प्रसंग यावयाच होताच. मीं जें कार्य हातीं घेतलं आहे, तें कार्य सिद्धीस नेण्याला भय्यासाहेबांची सहकारिता संपादन करणं शक्यच नव्हतं. आजच्या माझ्या कृतीनं भय्यासाहेब आणि हें घर त्यांना मी कायमचा पारखा झालों

पद २ ( भीमपलास झपताल )

**भालीं न लिहीला। विधिनें मला लेख। नाहीं दयाळा करुणाब्धि तुजला ॥ धृ ॥ भावें विधिचा संकेत असो कांहीं। माघार परि नाहीं ही एक दृढता ॥ १ ॥**

ज्यांनीं मला लहानाचा मोठा केला, स्वतःच्या मुलाप्रमाणं माझं संगोपन केलं, त्यांच्यापासून मला अलग राहावं लागणार. त्यांच्या प्रेमळ सहवासाल मला कायमचं मुकावं लागणार, ह्या विचारानं मनाला वाईट वाटणं साहजिक आहे. पण मला विशेष दुःख होत आहे ते हें कीं, मला मालतीच्या प्रेमाला तिलांजलि द्यावी लागणार ! मालतीचा विचार मनांत आला, म्हणजे माझा कृत-निश्चय डळमळूं लागतो. अंतःकरणाची चलबिचल होऊं लागते, प्रेम आणि कर्तव्य ह्यांचा संग्राम सुरू होतो. प्रेमाला बिलगून राहायचं, तर कर्तव्याला झुगारून दिलं पाहिजे. आणि कर्तव्याला कवटाळायचं, तर प्रेमाला आहुति दिली पाहिजे; अस विलक्षण पेंच पडला आहे प्रेम कीं कर्तव्य ? प्रेमाला पकडायचं कीं कर्त व्याशीं जखडायचं ? प्रेमाच्या शृंखलेनं बद्ध होऊन कर्तव्यापासून पराङ्मुख व्हायचं ? मालतीच्या मोहाला बळी पडून पवित्र कर्तव्यापासून भ्रष्ट व्हायचं ? प्रेमाचे पाश झुगारून देऊन मला कर्तव्याची कांसच धरली पाहिजे. आत एकदां मालतीचं दर्शन घेऊन ह्या घराला मला कायमचा रामराम ठोकला पाहिजे. ( जाऊं लागतो ) पण मालतीचं दर्शन झाल्यावर माझ्या मनाचा मोह मला आवरेल का ? नको ! त्या मोहक पाशापासून दूरच रहावं. मालतीला एकंदर हकीकत पत्रानं कळवितां येईल. पण नाहीं ! त्या मधुमालतीचं शेवटचं शुभ

दर्शन घ्यावंच. निश्चय बळकट असल्यावर मोहाची मातब्बरी मनावर चालण्याची— ( आंत मालती गाऊं लागते तें ऐकून ) अहाहा ! मालतीचाच मधुर रव ! पण हें मंजु गायन ऐकण्याचा हा शेवटचाच प्रसंग ! ( मालती गाणं गात प्रवेश करते ) मालती

पद २ ( मांड केरवा )

**प्रेमाचा नव रंग खुलाया । जीव जिवाचा खेळ व्हावा ॥ धृ ॥**
**अखंड चिंतन त्या स्वरुपाचें । प्रेम कथा नित गाता ॥ १ ॥**

**मालती**—आज मधुकर गुंजारव करायचा विसरला वाटतं ? आज राग आलेला दिसतो, आणि माझ्यावर रागवायचं ! मग मी भिऊन गेलें हो अगदीं ! आतां हंसायचंना एकदां ! पण हें काय! आज चेहरा असा म्लान कां ? असं काय संकट आलं आहे? मला नाहीं का सांगायचं ?

**मधुकर**—मालती, ह्या मधुकराचा गुंजारव आतां कायमचा विसर. तुझी आणि माझी ही शेवटची भेट. आजपासून तूं आणि मी एकमेकांना कायमचीं पारखीं झालों. भय्यासाहेबांनीं मला ह्या घरांतून तावडतोब चालता होण्याचा हुकूम केला आहे. मी आतां तुझी भेट घेत आहें. हा माझ्या हातून गुन्हाच होत आहे.

**मालती**—पण बाबांना इतका राग येण्याला आपल्या हातून असं झालं तरी कांय ?

**मधुकर**—मालती, मी दोन दिवसांपूर्वीं "मजुरांचे हक्क" ह्या विषयावर व्याख्यान दिलें. माझं हें करणं भय्यासाहेबांना पसंत पडलं नाहीं इतकंच नव्हे, तर ह्यापुढं ह्या बाबतींत एक अक्षरही न काढण्याबद्दल त्यांनीं मला बजाविलं. परंतु मजूर वर्गाची स्थिती सुधारण्याच्या कार्यालाच सर्वस्वी वाहून घ्यायचं असा माझा कृतनिश्चय असल्यामुळं, मला भय्यासाहेबांचं म्हणणं अमान्य करावं लागलं. माझ्या ह्या कृत्यानं भय्यासाहेबांना राग येऊन, त्यांनीं मला घरांतून तावडतोब चालता होण्याचा हुकूम केला आहे.

**मालती**—मग आपण खरोखरच मला सोडून जाणार ?

**मधुकर**—मालती, माझा नाईलाज आहे. मला भय्यासाहेबांचा हुकूम मान्य केलाच पाहिजे.

**मालती**—पण बाबांच्या इच्छेप्रमाणं आपण जर ह्या मजुरांच्या भानगडींत पडला नाहींत तर बाबांचा आपल्यावरचा राग ताबडतोब दूर होईल.

**मधुकर**—होय, भय्यासाहेबांचा राग तावडतोब दूर होईल, पण त्यांच्या इच्छेप्रमाणं वागणं म्हणजे मी माझ्या कर्तव्याला लाथ मारणं आहे.

पद ४ ( मिया मल्हार त्रिताल )

**या फुलाफुलासह राई। सहजाचि होई प्रमुदिता। अति विमल कुसुमिता। तरुलता लता॥ धृ॥ कुसुम स्वपथ परि तो सोडितां धूळींत त्याचि हो सांगता। निशिदिनीं जनीं मनीं आणि ध्यानीं मानहानी॥ १॥**

**मालती**—मग निदान माझ्या प्रेमासाठीं तरी बाबांच्या इच्छेप्रमाणं वागायला आपण तयार नाहीं का होणार?

**मधुकर**—मालती, तुझ्या प्रेमासाठीं कोणतंही दुर्धर संकट सोसण्यास मी तयार होईन, पण माझ्या कर्तव्याला मात्र मी विसरणार नाहीं. कर्तव्य आणि प्रेम ह्यांमध्यें मला निवड करायची आहे. सांग, मालती, तूंच सांग, मी प्रेमासाठीं कर्तव्याला झुगारून देऊं का? मालती, मी कर्तव्यपराङ्मुख झाल्यावर माझ्यांत नांव घेण्यासारखं काय राहिलं? कर्तव्यहानीचा काळिमा माझ्या तोंडाला लागल्यावर, माझी किंमत कवडीइतकी देखील रहाणार नाहीं तेव्हां मालती, माझ्या कर्तव्याला मला जागलंच पाहिजे, आणि माझ्या कर्तव्याला जागण्यासाठीं मला इथून तावडतोब गेलंच पाहिजे.

**मालती**—मग मीही आपल्याबरोबर येतें.

**मधुकर**—काय! तूं माझ्याबरोबर येणार? हा काय भलताच अविचार!

**मालती**—अविचार, अविचार कसा? आपल्या कर्तव्याला जागृत राहण्यांत आपण जसे तत्पर आहांत, त्याचप्रमाणं माझ्या प्रेमाला जागृत राहण्यांत मीं तत्परता दाखविली, तर त्यांत माझा अविचार कसा!

**मधुकर**—मालती, तुझ्या दृष्टीनं जरी हा अविचार नसला, तरी लोकदृष्टीनं तुझं हें कृत्य निंद्यच ठरणार. माझ्याबरोबर तूं अशा रितीनं आलीस तर तुझ्या आणि माझ्या शीलाबद्दल लोक भलभलते कुतर्क करूं लागतील. शिवाय भय्यासाहेब तर तुझ्या वर्तनानं चिडून जातील. आणि तुला अशा रितीनं वागण्याला

मीं चिथावलं असाच त्यांचा ग्रह होईल. मालती, मी तुला असा अविचार कधींही करूं देणार नाहीं. मला आता इथं अधिक वेळ थांबतां येत नाहीं.

**मालती**—माझी आणि आपली भेटही न होऊं देण्याचा निष्ठुरपणा बाबा करतील असं मला वाटत नाहीं. इतकंच नव्हे तर बाबांचा आपल्यावरील झालेला राग मी दूर करीन असा मला भरंवसा आहे.

**भय्यासाहेब**—( प्रवेशून ) मालती, तुझा भरंवसा व्यर्थ आहे. मधुकरा-वरील माझा राग नाहींसा होणं शक्य नाहीं. मधुकर, मी तुला ह्या घरांतून एकदम चालतां होण्याचा हुकूम केला असतां तूं अजून इथं निर्लज्जपणानं रेंगाळत राहा-शील अशी माझी कल्पना नव्हती. शिवाय माझ्या आज्ञेविरुद्ध मालतीची अशी चोरून भेट घेण्याचा बेशरमपणा करशील असंहि मला वाटलं नव्हतं. मधुकर, तुझ्या ठिकाणीं जर कांहीं स्वाभिमान असेल, तर आतांच्या आतां एका क्षणाचाही विलंब न लावतां एथून एकदम चालता हो.

**मालती**—पण बाबा आपण इतके रागावण्यासारखं मधुकरांच्या हातून गुन्हा तरी काय झाला !

**भय्यासाहेब**—मालती, मधुकराकडून तसाच घोर अपराध झाला आहे. पाळलेला सर्प ज्याप्रमाणं अन्नदात्यावर उलटतो त्याप्रमाणं मधुकर कृतघ्न झाला आहे, आणि मालती याउप्पर मधुकराशीं, तूं केव्हांही भाषण अगर भेट यांचा कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवतां कामा नये, आणि जर माझ्या आज्ञेचं तुझ्या-कडून उल्लंघन झालं, तर तुला हीं तावडतोब हें घर सोडावं लागेल, हें लक्षांत असूं दे.

**मालती**—बाबा, तुम्हीं आज एवढे निष्ठुर का झालांत ! बाबा, मधुकरांवर असे रागावूं नका. त्यांच्याबद्दल मी आपली क्षमा मागते.

**भय्यासाहेब**—मालती, तुझ्या विनवणींचा कांहींही उपयोग होणार नाहीं. मधुकर, Get you gone atonce !

**मालती**—बाबा, नको हो असे निर्दय होऊं ! मी पदर पसरते.

**मधुकर**—मालती, माझ्याकरतां विनाकारण तूं आपल्या जिवाला कां जाळी करतेस ? भय्यासाहेब, आपल्या हुकुमाविरुद्ध मी इथं राहून मालतीची भेट घेतली, ह्याबद्दल मला क्षमा करा. आतां एक क्षणभरही मी इथं राहाव नाहीं. आपण आतां माझ्यावर कृतघ्नतेचा आरोप केलांत परंतु परमेश्वराची शपथ घेऊन

सांगतों, कीं असा बेइमानीपणा माझ्या हातून केव्हांही होणार नाहीं. आपल्या आणि माझ्या मतांमध्यें कितीही भिन्नता असली तरी, आपले उपकार मी आजन्म विसरणार नाहीं.

भय्यासाहेब—बस्स कर तुझी बडबड, आणि एथून एकदां काळं कर.

मालती—बाबा, निदान माझ्याकरितां तरी मधुकरांना राहूं द्या.

भय्यासाहेब—माझा हुकूम झाला तो कायमचा. मधुकर, चालूं लाग.

(मधुकर जातो.)

---

## प्रवेश २ रा

(रस्ता. विश्वनाथ व सगुणा येतात)

विश्वनाथ—अहाहा ! खरोखरच माझी माउली धांवून आली ! पोरी, देव तुझं कल्याण करो. लोक मला वेडा म्हणतात, पण मला वाटतं, तूंच वेडी आहेस. वेड्या माणसाची कधीं कोणी काळजी घेतली आहे कां ? पोरी, वेडा मनुष्य म्हणजे शहाण्यांच्या करमणुकीचा एक विषय. साऱ्या लोकांप्रमाणं माझी हेटाळणी करण्याचं टाकून देऊन तूं माझ्यासाठीं एवढी खस्त कां खातेस ? दररोज माझ्यासाठीं भाजीभाकर आणण्याचा व्यर्थ खटाटोप तूं कां करतेस? तूं कोण माझी, आणि मी कोण तुझा, कीं माझ्यासाठीं तुझं अंतःकरण असं कळवळून यावं ! पोरी, वेड्यासाठीं इतकी झीज कशाला घेतेस ?

सगुणा—बाबा, लोक तुम्हांला वेडा म्हणत असतील, पण मी तुम्हांला तसं कधींही म्हणणार नाहीं. आणि तुम्हीं तरी आपल्याला वेडा कां बरं म्हणवून घेतां ?

विश्वनाथ—(स्वगत) वेडा कां म्हणवून घेतों ! हिच्या प्रश्नाला काय उत्तर देऊं ! ह्या सरळ मनाच्या भाबड्या पोरीला माझ्या दुर्दैवाची कहाणी सांगून हिच्या कोंवळ्या अंतःकरणाला उगाच कशाला दुःख देऊं ?

सगुणा—बाबा, असे तुम्ही श्वास कां बरं सोडतां ? खरंच, तुम्हांला अंतर्यामीं कांहीं तरी दुःख होत असलं पाहिजे. आपलं दुःख दुसऱ्याला सांगितलं, म्हणजे थोडं तरी हलकं होतं असं म्हणतात. बाबा, तुमची हकीकत ऐकण्याची मला फार दिवसांपासून इच्छा आहे. तुमच्या दुःखाचा भार थोडा फार मला नाहीं कां कमी करतां येणार ?

**विश्वनाथ**—माझ्या दुःखाचा भार, पोरी, तूं कमी करणार! माझं दुःख—माझ्या यातना—अशा आहेत कीं, त्या माझ्या मलाच सहन केल्या पाहिजेत, आणि यांतून मुक्त होण्याला एकच मार्ग आहे.

**सगुणा**—पण आपलं दुःख आंतल्या आंत सहन करण्यापेक्षां आपल्या कळकळीच्या माणसाला तें सांगितलं, तर दडपून गेलेल्या जिवाचा भार थोडा हलका नाहीं का होणार? बाबा, तुमच्याबद्दल माझं अंतःकरण खरोखर कळवळून येतं. बोला, बाबा, बोला, कां बोलत नाहीं तुम्हीं? माझ्यावर रागावला होय?

**विश्वनाथ**—तुझ्यावर राग! माझ्यासाठीं अंतःकरणापासून कळवळणाऱ्या प्राण्यांवर मी रागावूं? तुझा माझा काडीचाही संबंध नसतां, पोटच्या मुलीप्रमाणं माझ्यावर माया करतेस, त्या तुझ्यावर मी रागावूं? नाहीं. बाळ, तुझ्यावर मी कधींहीं रागावणार नाहीं. तूं इतक्या आपलेपणानं विचारतेस, म्हणून माझ्या दुर्दैवाची कहाणी सांगतों ऐक. तुझ्याकडे पाहिलं, म्हणजे माझ्या पूर्ववृत्तांताची आठवण होऊन अंतःकरण भडभडून येतं! तुझ्यासारखीच माझी सद्गुणी स्त्री होती, तुझ्यासारखीच ती रूपानं सुंदर होती. आम्हीं दोघेजण एकाच कारखान्यांत कामावर होतों. कांहीं दिवस आमचा संसार फारच सुखाचा झाला, पण पुढं कांहीं नादान लोकांच्या संगतीनं मला शर्यतीचं आणि दारूचं व्यसन जडलं. ह्या दोन्ही दुष्ट व्यसनांचा मी बंदा गुलाम बनलों. कामावरून मला काढून टाकण्यांत आलं. शर्यतीचा आणि दारूचा नाद पुरविण्याकरितां, मी बायकोकडून तिला मारझोड करून पैसे घेऊं लागलों. मीं दुष्टानं तिचे नाहीं नाहीं ते हाल केले. शेवटीं माझ्या नादानपणानं आणि तिच्या सौंदर्यानं तिचा बळी घेतला. ज्या कारखान्यांत आम्हीं कामावर होतों, त्या कारखान्यांतील मॅनेजर नीच वृत्तीचा पशु होता. त्याची पापी नजर माझ्या बायकोवर गेली. तिच्या ह्या नादान नवऱ्याचं पोट जाळण्यासाठीं तेला कामावर जाणं भाग पडत होतं. शेवटीं त्या नीच नराधमानं—

**सगुणा**—काय केलं?

**विश्वनाथ**—अरेरे! तुला कोणत्या तोंडानं सांगूं? त्या माझ्या सुशील सद्गुणी स्त्रीवर बलात्कार करण्याचा प्रयत्न केला, आणि त्या साध्वीनं आपली अब्रू वांचविण्यासाठीं स्वतःच्या प्राणाचा बळी दिला; आणि ज्यावेळीं त्या पतिव्रतेनं

आपलं शील राखण्यासाठीं आपल्या देहाची आहुती दिली, त्याच वेळीं हा तिच बेशरम बेवकूब नादान नवरा, दारूनं बेहोष होऊन पडला होता. त्या प्रसंगाची आठवण झाली, म्हणजे माझ्या अंगाचा भडका होऊन जातो, आणि त्या चांडाळाच्या नरडीचा घोट केव्हां घेईन असं होतं. पोरी, त्या दिवसापासून माझी वेड्यासारखी स्थिती झाली. कांहीं दिवसांनीं माझं डोकं ठिकाणावर आलं. पण बाहेरुन तसं कोणाला न दाखवितां मी वेड्याची वृत्ति कायम ठेवली. असं करण्यात माझा एकच हेतु आहे, तो तेवढा साधला, म्हणजे ह्या वेड्याच्या वेषाला आणि जगाला कायमचा रामराम ठोकणार.

**सगुणा**—बाबा, तुमची ही हकीकत ऐकून मला फारच वाईट वाटतं. ज्या चांडाळानं तुमच्या आयुष्याची अशी माती केली, त्याचा सत्यनाश होवो ! तुमची ही हकीकत ऐकल्यापासून मला कसं अगदीं चमत्कारीक वाटूं लागलं आहे. आणि बाबा, मला एक प्रकारची भीतीहि वाटूं लागली आहे.

**विश्वनाथ**—पोरी, तुला कसली भीति वाटूं लागली आहे ?

**सगुणा**—बाबा, माझ्या घरधन्यानांही असंच शर्यतींचं व्यसन लागलं आहे. आणि मी ज्या कारखान्यांत कामाला जातें, त्या कारखान्याचा मॅनेजरही असाच पापी बुद्धीचा पशु आहे. बाबा, तो माझ्याकडे नेहमीं वाईट नजरेनें पाहत असतो. तुमची हकीकत ऐकल्यापासून मला तर फार भीति वाटूं लागली आहे.

**विश्वनाथ**—तुझ्या त्या कारखान्याच्या मॅनेजरचं नांव काय ?

**सगुणा**—कृष्णराव.

**विश्वनाथ**—कोण कृष्णराव ! त्या नराधमाचं नांव कृष्णराव ! तो नीच चांडाळ पाजी कृष्णराव कुठं आहे तें सांग, म्हणजे ह्या क्षणीं जाऊन त्या सैतानाच्या नरडीचा घोट घेतों.

**सगुणा**—बाबा, तुम्ही संतापानें असे भडकून कां गेलांत ? तुमची चर्या अशी एकदम कां पालटली ? तुमचे डोळे पहा कसे तारवटून गेले आहेत ! बाबा, काय झालं हो तुम्हांला ! बाबा, असे काय हो तुम्ही पाहतां ! बाबा, मला भीति वाटते हो अगदीं !

**विश्वनाथ**—नको. बाळ भिऊं नकोस ! मला कांहीं झालं नाहीं बरं ! मला हा वेडाचा झटका मधून मधून येत असतो, दुसरं कांहीं नाहीं. तूं मला ही हकी

वत सांगितलीस हें फार चांगलं केलंस. पोरी, दुर्दैव तुझं. कीं तुझ्या नवऱ्याला हा भिकेस लावणारा शर्यतीचा नाद लागावा! आणि तुझ्यासारख्या मुलीला ह्या नरपशूच्या हाताखालीं काम करण्याचा प्रसंग यावा. पोरी, आतां तूं फार सावधगिरीनं रहा. त्या नराधमाच्या हालचालीवर अगदीं बारीक नजर ठेव. आणि कांहीं कमी अधिक होतांच तावडतोब कळीव. तूं भिऊं नकोस. परमेश्वर तुझा पाठिराखा आहे. जा, आतां तुझी कामावर जाण्याची वेळ झाली. तुला सांगायचं एवढंच, कीं " नको करूं खेद कोणत्या गोष्टीचा। लक्ष्मीचा पति जाणतसे। सकळ जगाची वहातसे चिंता। तुज मोकलील ऐसें नाहीं " जा. ईश्वर तुझं कल्याण करो. ( जातात )

---

## प्रवेश ३ रा

( हॉलमध्यें तारा वाचीत बसली आहे. आनंदराव प्रवेश करतो. )

**आनंदराव**—नानासाहेब घरांत आहेत का? आपल्याला वाटत असेल, कीं मी आपल्या भेटीला आलों आहें, पण त्या बाबतींत मला आपली निराशा करावी लागते, ह्याबद्दल वाईट वाटतं.

**तारा**—त्याबद्दल आपल्याला हळहळण्याचं मुळींच कारण नाहीं. आपण एथून चालते व्हाल, तर माझ्यावर मोठा अनुग्रह होईल.

**आनंदराव**—हें आपलं ह्मणणं साफ खोटं आहे, आपण इतका वेळ माझ्याकडे झाकल्या डोळ्यांनीं पाहात होतां, ह्या गोष्टीकडे माझी थोडीच डोळेझांक झाली आहे! मला ठाऊक आहे, माझ्या चेहऱ्यांत तशीच जादू आहे! त्याला आपण तरी काय करणार? आज घरीं गेल्यावर दृष्ट काढून घेतली पाहिजे. खरोखर, पुरुषांना देखणेपणा असणं घातकीच!

**तारा**—अहाहा! काय लावण्य उतून चाललं आहे? खरंच बाई! फार जपलं पाहिजे हो असल्या मोहक चेहऱ्याला! पण मी ह्मणतें, अशा दृष्ट लागणाऱ्या मुखड्याला गोषांतच गुरफटून ठेवाव.

**आनंदराव**—खरोखर, बायका आतां पुरुषांकडे इतक्या धिटाईनं पाहूं लागल्या आहेत, कीं पुरुषांनीं गोषांत राहणंच श्रेयस्कर, असं मला वाटूं लागलं आहे.

**तारा**—लागले अकलेचे तारे तुटायला ! आपल्याला बाबांना भेटायचं आहे ना ?

**आनंदराव**—होय.

**तारा**—मग बाबा घरांत नाहींत.

**आनंदराव**—नसूं द्यात, कांहीं हरकत नाहीं. नानासाहेब येईपर्यंत मी इथंच बसतों म्हणजे झालं.

**तारा**—हें पहा, असला लोंचटपणा मला खपायचा नाहीं. आपण बाबांना भेटायला आलां आहांत ना, आणि मी कांहीं बाबा नाहीं.

**आनंदराव**—नसाल.

**तारा**—मग कां हा कोडगेपणा ?

**आनंदराव**—पण इथं बसण्याला मलाही थोडा अधिकार आहे. नानासाहेबांनीं मला जामात मानलं आहे.

**तारा**—बाबांनीं पुष्कळ मानलं असेल, पण मी कुठं मानलं आहे ?

**आनंदराव**—परमेश्वर खैर करो, आणि असला प्रचंड प्रमाद आपल्या हातून कधींही न होवो ! नानासाहेबांचा जामात होण्याची माझी इच्छा आहे, आपला जामात होण्याची माझी मुळींच महत्वाकांक्षा नाहीं. ( तारा त्याच्याकडे पाठ फिरवून बसते ) भेटायला आलेल्या गृहस्थाकडे–आपल्याला नाहीं आपल्या वडिलांना भेटायला आलेल्या गृहस्थाकडे पाठ फिरवून बसणं ही काहींतरी नवीनच फॅशन दिसते ! आपण कांहीं वाचीत आहां वाटतं ! अशीच पाठ फिरवून उत्तर दिलं तरी चालेल, आपल्या मुखचंद्राचं दर्शन घेण्याला मी अगदीं हपापलों आहे असं समजूं नका. कसलं पुस्तक आहे तें ? कां ? आतां अगदीं तोंडाला तोंड द्यायचं नाहीं असं ठरविलं आहे वाटतं ! पण मी असा वेडयासारखा काय विचारतों ! आपण दुसरं काय वाचणार ! " प्रणय प्रळय " " झुकता पदर " " तिरपा भांग " नाहीं तर " होरपळलेली हरणी " " गहिरी गजरा " " तलख तारा "—

**तारा**—बस करा तुमची वटवट. पहा, नीट डोळे फोडून पहा. ही कादंबरी तुम्ही म्हणतां तसली " होरपळलेली हरणी " " गहिरी गजरा " कीं " तलख तारा " आहे ती !

आनंदराव—कादंबरी जरी तळख तारा नसली, तरी माझ्यासमोर उभी असलेली तरुणी मात्र तळखतारा आहे खास. एकदांचा कोकिळेचा कंठ फुटला. मैना बोलती झाली, ह्यांतच मला धन्यता वाटते.

पद ५

तुझ्या हृदयींचा। भाव प्रगटला। बोल उमटला रसमय साचा। मानि रंगली मंजुळ मैना॥ धृ॥ हा सुबोला तव मुखीं स्फुरला हरपत शीण मनाचा। कोकिळ रानीं घेई ताना॥ १॥

तरुणीचं तोंड उघडण्याची कला मला अवगत आहे, ह्याबद्दल आतां आपल्या-कडून सर्टिफिकेट मिळायला कांहीं हरकत नाहीं. आतां तरुणीचं तोंड खुलं करण्याची कला जशी मला अवगत आहे तशीच मोहक मुखाला कुलुप घाल-ण्याची करामतही मीं साध्य करून घेतली आहे. आपल्याला अनुभवास घ्यायचा असेल तर—

तारा—तुम्ही चालते व्हा पाहूं अगोदर. वात्रटपणाला कांहीं तरी मर्यादा!

आनंदराव—बरं जाऊं द्या, कोणतं पुस्तक वाचीत आहां आपण?

तारा—टवाळकी करायची असेल, तर मुळींच सांगत नाहीं. पण खरोखर मनापासून विचारीत असाल, तर—

आनंदराव—अगदीं मनापासून. ह्या सिगरेट केसची शपथ!

तारा—झालं तुमचा वात्रटपणा सुरू. मी नाहींच सांगत तुम्हांला.

आनंदराव—अशा रागावूं नका. I beg your pardon मग तर झालं? अगदीं खरोखर कसलं पुस्तक वाचतां तें ऐकण्याची माझी इच्छा आहे. माझ्या-वर तुमचं प्रेम आहे ही गोष्ट जितकी खरी आहे—

तारा—कुणीं सांगितलं माझं तुमच्यावर प्रेम आहे म्हणून?

आनंदराव—काय प्रश्न हा! प्रेमशास्त्रासंबंधीं काय अफाट अज्ञान हें? प्रेम आहे हें कोणीं सांगायला का लागतं? प्रेम सांगायला लागत नाहीं, तें आपोआप पटतं. शिवाय कोणत्या तरुणीनं आपल्या प्रेमाचा कबूलीजबाब दिला आहे? पण तुमचं प्रेम माझ्यावर आहे हें मला पूर्णपणं पटलं आहे.

तारा—मनांत मांडे मनमुराद खावे. कोण हात धरायला बसलं आहे?

आनंदराव—पण हात धरायला कोणी तरी लौकरच उभं राहणार आहे ह्याची खात्री असल्यावर मनांत मांडे कोण खाणार? मंडपांतच खाणार. बरं, तुमच्या

पुस्तकाचं तसंच राहिलं. आता अगदीं अंतःकरणपूर्वक विचारतों, कीं कोणतं पुस्तक आपण वाचीत आहां ?

तारा—मी तुमच्याशीं एक शब्दही बोलूं इच्छीत नाहीं. तुम्हांला पुस्तकाचं नांव सांगायचं कशाला ? तुमच्याकडून हेटाळणी करून घेण्याकरितां कीं नाहीं ? पण हें पुस्तक इतकं सुंदर आहे कीं, तुमच्या सहवासापेक्षा मला ह्याचंच सान्निध्य सुखकर वाटतं. मी आपली खोलींत जाऊन वाचीत बसतें कशी ! ( घाईनें जाऊं लागते, इतक्यांत पुस्तक हातांतून खालीं पडतें. )

आनंदराव—आपलं आवडतं पुस्तक पडलं ! ( तारा तें उचलूं लागते, इतक्यांत आनंदराव तें पटकन उचलतो. ) ( पुस्तक हातांत घेऊन ) झाला आपवात टॅक्स ! पुस्तकाचं नांव कळविण्याची तर मनापासून इच्छा, पण तें स्वतःच्या तोंडानं सांगायचं नाहीं, ह्मणून मग त्यासाठीं खोटा आविर्भाव ! उसना राग ! लटकी घादल ! असा लंपडाव खेळावा लागतो !

तारा—काय, माझा खोटा अविर्भाव ? लटकी धांदल ! उसना राग ! अडलं आहे माझं इतका खटाटोप करायला ! द्या पाहूं माझं पुस्तक.

आनंदराव—नाव तर पाहूं द्या, काय ? " केवळ प्रेमासाठीं " ओहोहो ! ह्या प्रेमानं आणि लेखकांनीं कहर करून सोडला आहे ! प्रेमाशिवाय दुसरा कोणाला विषयच नाहीं. ज्याला त्याला प्रेमाचं वेड. पण हे लेखक जगापुढं प्रेमाचं वेड मांडतांना आपलं स्वतःचं वेडेपणावरचं प्रेम मात्र व्यक्त करतात !

तारा—सध्या आपल्या वेडेपणाचं मात्र खास प्रदर्शन होत आहे. द्या पाहूं माझं पुस्तक !

( आनंदरावाच्या हातांतील पुस्तक हिसकावून घेते व जाऊ लागते. आनंदराव तिला थांबविण्याचा प्रयत्न करतो, इतक्यात नानासाहेब आणि मधुकर येतात. )

नानासाहेबः—तारे, इतकी रागावलीस का बाळ ?

तारा—बाबा, हे पहा मला कसे विनाकारण सतावीत आहेत !

आनंदराव—नानासाहेब " हे " हा शब्द आपण लक्षात घ्या. ओहो ! मधुकर, तूं इकडे कोणीकडे ? नानासाहेब, ही वल्ली आपल्याला कुठं सापडली ?

नानासाहेब—आनंदराव, तुमची आणि मधुकराची चांगली जानपछान आहेच, तारे, मधुकर हे एक कार्यकर्ते पदवीधर आहेत. मधुकराची स्थिती सुधार-



भय्यासाहेब :—माझा हुकुम झाला तो कायमचा. मधुकर चालू लाग ! (पृष्ठ—१०)

ण्याचं कार्य त्यांनीं हातीं घेतलं आहे, व त्याकरितां स्वार्थावर लाथ मारण्याचं मनोधैर्य त्यांनीं दाखविलं आहे. मधुकर, ही माझी मुलगी तारा.

**मधुकर**—I am glad to see you

**तारा**—बाबा, कालच्या सूर्योदयांत मजुरांची सद्यःस्थिती ह्या विषयावर ज्याचा लेख आला आहे, तेच हे मधुकर वाटतं ?

**नानासाहेब**—होय तारे.

**तारा**—आपला लेख मला फारच आवडला !

**मधुकर**—Thanks very much

**नानासाहेब**—तारे, मला एका महत्वाच्या मिटींगला अटेंड व्हायचं आहे, त्यामुळं आपल्या पाहुण्यांचं आदरातिथ्य तुलाच केलं पाहिजे.

**तारा**—बाबा, मला पण आमच्या महिला मंडळाच्या सभेला जायचं होतं पण मधुकरांसारखे पाहुणे आल्यावर, मला आतां घरीं राहिलंच पाहिजे.

**आनंदराव**—हं ! नशीब त्या पाहुण्याचं !

**नानासाहेब**—मधुकर, माफ करा मला जावं लागत आहे त्याबद्दल. पण मिटींग इतकी इंपॉर्टंट आहे कीं, मला हजर राहिलंच पाहिजे. तारे, पाहुण्यांची बरदास्त नीट ठेव बरं का ? शिवाय आनंदराव तुझ्या मदतीला आहेतच !

(जातो.)

**तारा**—मला दुसऱ्या कोणाच्या मदतीची मुळींच जरूर नाहीं. पाहुण्यांचा समाचार कसा घ्यायचा हें मला पुरं माहीत आहे.

**आनंदराव**—म्हणूनच मला इथं राहिलं पाहिजे. आणि मधुकर, तरच तुझी धडगत ! आपण किती खरपूस समाचार घेतां ह्याचा मला आतांच अनुभव आला आहे.

**मधुकर**—माझ्या येण्यामुळं आपल्याला महिला मंडळाच्या सभेला मुकावं लागलं, ह्याबद्दल खरोखर मला फार दिलगिरी वाटते. आजच्या आपल्या सभेचा विषय कोणता होता ?

**आनंदराव**—मधुकर,काय तुझा हा प्रश्न ? तुला खरोखर कॉमनसेन्स कमीच दिसतो ! अरे, महिला मंडळाची सभा, आणि विषय दुसरा कोणता असणार ? "स्वयंपाकघरांतील गोष्टी !"

**तारा**—काय ? स्वयंपाकघरांतल्या गोष्टी ? ते दिवस आतां गेले बरं का ! आजच्या सभेचा विषय स्वयंपाकघरांतल्या गोष्टी हा नसून, पुरुषांची सणसणीत षष्ठी हा आहे बरं का ?

**आनंदराव**—मधुकर, आतां चलाच एथून. नाहींतर सभेला इथंच सुरवात व्हायची !

**मधुकर**—आनंदराव, राहूं दे तुझी थट्टा. मी खरंच विचारतों, आजच्या सभेचा विषय कोणता होता ?

**तारा**—आपण विचारतां म्हणूनच सांगतें, आजचा विषय "समाजसेवा" हा आहे. आमच्या महिला मंडळाच्या कांहीं भगिनीनीं समाजसेवेला आपलं सर्व आयुष्य वाहण्याचं ठरविलं आहे, आणि (आनंदरावाकडे पाहून) तशीच वेळ आली तर समाजसेवेसाठीं मी देखील आजन्म अविवाहित राहण्याचा निश्चय करीन !

**आनंदराव**—बेशक करा; पण आपण अशा माझ्याकडे टंवकारून कां पाहतां ! तुम्हीं आजन्म अविवाहित रहा, नाहीं तर सात जन्म अविवाहित रहा.माझी मुळींच हरकत नाहीं. पण तुम्हीं कौमार्यव्रताची शपथ घेतलीत, तर लागलीच मी ब्रह्मचर्याची दीक्षा घेईन, असं मात्र मुळींच समजूं नका. ब्रह्मचारी संस्थेचं लाईफ मेंबर होणं, माझ्या तबियतीला अगदीं मानवणार नाहीं.

**मधुकर**—ताराबाई, आनंदरावच्या बडबडण्याकडे तुम्हीं लक्ष देऊं नका. आपलं म्हणणं मला पटतं. मींही अशाच एका समाजकार्याला वाहून घेतलं आहे, आणि त्यामुळं पुढं चालून आलेल्या लक्ष्मीवर मला लाथ मारावी लागली, इतकंच नाहीं. तर माझ्या जीवाचा कलिजा मला माझ्या हातानं दूर लोटावा लागला ! समाजसेवेचं व्रत असं खडतर आहे,कीं, तें एकदां अंगीकृत केलं,म्हणजे सुखाचा मोह आणि प्रेमाचे पाश झुगारून देऊन संकटांशीं आणि आपत्तींशीं झगडण्याल तयार झालं पाहिजे.

पद ६ (देसकार त्रिताल)

**स्वसुख विष वाटतें । त्याला तें परसेवा अनुदिनी ज्या हृदयिं नांदे ॥ धृ ॥ मानें मानीना संकटांना नाना । स्विकाराया अनुचिता । हासुनि हृदिं जाणा ॥ १ ॥**

## अंक पहिला समाप्त.

# अंक २ रा

## प्रवेश १ ला

( ऑफिसरूम—कृष्णराव व भय्यासाहेब बसले आहेत )

**कृष्णराव**—मधुकररावची हकीकत आपल्याला कळली का ?

**भय्यासाहेब**—मला कळण्याची मुळींच जरूर नाहीं. आणि मधुकरचं नांव ह्याउप्पर माझ्यापुढं मुळींच काढूं नका.

**कृष्णराव**—साहेबांच्या हुकुमाबाहेर मी मुळींच जाणार नाहीं, पण मीं असं ऐकलं आहे कीं, सध्यां नानासाहेबांनीं मधुकररावना ह्यातारीं धरलं आहे.

**भय्यासाहेब**—नानासाहेबांनी मधुकरला ह्यातारीं धरूं द्या, नाहींतर पोटाशीं कवटाळूं द्या, मला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. कृष्णराव, मधुकरला माझं घर कायमचं बंद झालं आहे हें लक्षांत असूं द्या. आणि ह्या बाबतीत तुम्ही एक अक्षर सुद्धां काढलेलें मला खपणार नाहीं.

**कृष्णराव**—साहेबांच्या हुकुमाविरुद्ध बोलण्याचं मी धाडस करीत आहें, ह्याबद्दल साहेबांची क्षमा मागतों, पण मधुकररावना एकदम घराबाहेर घालवून देण्यांत साहेबांचा थोडा उतावीळपणा, नाहीं का झाला ? मधुकररावचे अपराध पोटांत घालून साहेबांनीं त्यांच्यावर मेहेर नजर करावी अशी माझी Humble suggestion आहे.

**भय्यासाहेब**—कृष्णराव, आज तुम्ही शुद्धीवर आहांत ? काय ह्मणे माझी हंबल सजेशन आहे ! पण तुह्मी कोण मला सूचना करणार ! and who the devil cares for your suggestion ? कृष्णराव, तुह्मी माझे नोकर आहांत, नोकरानं आपल्या पायरीनं वागलं पाहिजे हें लक्षांत ठेवा, आणि तुह्मांला शेवटचं सांगतों कीं, मधुकरचं थोबाड न पाहाण्याचा माझा निश्चय केव्हांही बदलणार नाहीं, आणि ह्या बाबतींत पुनः जर कांहीं सूचना किंवा विनंती तुह्मी कराल तर तुह्मांला नोकरीला मुकावं लागेल हें ध्यानांत ठेवा.

**कृष्णराव**—ह्यापुढं साहेबांच्या हुकुमाबाहेर वागणार नाहीं.

( नोकर भय्यासाहेबांच्या हातांत एक व्हिजिटिंग कार्ड आणून देतो. )

**भय्यासाहेब**—( कार्ड वाचून ) कोण आनंदराव ! येऊं दे त्यांना आंत ( नोकर जातो व आनंदराव येतो. ) Hallo आनंदराव या बसा, आज इकडे कोठें वाट चुकलां ?

**आनंदराव**—नाहीं, वाट मुळींच चुकलों नाहीं, आपल्याकडेच येण्याचं योजिलं होतं, आणि त्याप्रमाणं वाट न चुकतां अगदी सरळ आपल्याकडे आलों आहें.

**भय्यासाहेब**—काय, खास माझ्या भेटीला आलांत ! वा ! मग आमच्या-वर ही मोठी मेहेरबानीच ! काय, चहा सोडा ?

**आनंदराव**—thanks very much कांहीं नको. मी थोडया काम करिता आपल्याकडे आलों आहें. आपल्याला जर वेळ असेल—

**भय्यासाहेब**—आनंदराव, वेळेचा काय प्रश्न ? तुमच्याकरितां माझी एखादी अपॉइन्टमेंट असली तरी देखील मी ती कॅन्सल करीन. हं ! बोला, काय काम आहे ? पण आज तुम्हीं अगदीं सिरिअस आहांत ? तुमची नेहमींची रंगेल वृत्ति दिसत नाहीं हें कसं ?

**आनंदराव**—ज्याप्रमाणं अन्नामध्यें फेरबदल करायला पाहिजे, त्याचप्रमाणं माणसानं आपल्या वृत्तीमध्यें मधून मधून थोडी नवी नवाई दाखविली पाहिजे. नेहमींचीं गंभीर वृत्तीचीं माणसं एकादे वेळीं अशी कांहीं मजा करतात कीं, रंगेल-पणांत रुळलेल्या बहाद्दरालाही त्याचा हेवा वाटावा ! मलाही नेहमींच्या आनंदी वृत्तीचा कंटाळा येऊन आज थोड्या सिरिअस मूडमध्यें शिरण्याची लहर आली आहे एवढंच.

**भय्यासाहेब**—अस्सं ! बरं तुमचं काम कोणतं तें तर बोला.

**आनंदराव**—मधुकराच्या बाबतींत बोलण्याकरितां मी आज आपल्याकडे आलों आहें.

**भय्यासाहेब**—माफ करा आनंदराव, पण त्या बाबतींत आतां बोलण्या-सारखं कांहींच राहिलं नाहीं. मधूकरशीं कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवायचा नाहीं, हा माझा निश्चय अगदीं ठाम आहे. मधुकरबद्दल माझं मत बदलणं आतां शक्य नाहीं.

**आनंदराव**—भय्यासाहेब, सध्यां समाजाच्या एकंदर आचारांत विचारांत आणि कल्पनांत सारख्या घडामोडी होत आहेत, तेव्हा अशा परिस्थितीत एकाद्या

व्यक्तीनं आपल्या ठराविक मतांला कवटाळून बसणं हें Out of Fashion आहे असं मला वाटतं.

**भय्यासाहेब**—आनंदराव Excuse me पण हा विषय अधिक न वाढवाल तर मी आपला फार आभारी होईन.

**आनंदराव**—ह्मणजे तोंड बंद करण्याची नोटीसच ! पण तोंड बांधून बसण्याचा मला मोठा कंटाळा आहे, तेव्हा मीं आपली रजा घेतों.

**भय्यासाहेब**—I am verry sorry आनंदराव but I hope you will not be angry with me.

**आनंदराव**—Oh no ! Not in the least पण भय्यासाहेब, मधुकरबद्दलचें तुमचें सध्याचें मत तुह्मांला बदलण्याची लौकरच पाळी येईल. बरं आहे Good day ! ( जाऊं लागतो. )

**भय्याहेब**—थांबा, मलाही बाहेर जायचं आहे. मी तुमच्याबरोबरच येतों ( भय्यासाहेब आनंदराव जातात )

**कृष्णराव**—हें काम ठीक झालं. माझा हा उलटा मंत्र चांगलाच लागू पडला. मधुकर आता परत येण्याची मुळींच धास्ती नाहीं. त्याची चांगलीच हकालपट्टी झाली. मधुकर मॅनेजर होऊन बसतो कीं काय अशी मला धास्ती होती, आणि तसं झालं असतं म्हणजे आमचे तेव्हांच बारा वाजले असते. इतकेंच नव्हे, तर आम्हीं या वेळीं सरकारी पाहुणचार घेत पडलों असता ! आतांची वेळ निभावली, पण पक्का बंदोबस्त केला नाहीं तर आम्हीं केलेली अफरातफर कधीना कधीं तरी उघडकीस येणारच. हा बंदोबस्त एकाच मार्गानं होण्यासारखा आहे, आणि तो मार्ग म्हणजे कारखान्यांतील सर्व कागद पत्रांना आग लावली पाहिजे. कागदपत्रांना आग लावण्याकरितां कारखान्यालाही आगींत पडावं लागेल, पण आपल्याला त्याबद्दल विशेष फिकीर करण्याचं कारण नाहीं. माझे पुढचे सारे बेत जुळवून आणण्याकरितां मला प्रथम त्या वैजनाथला माझ्या काबूत आणलं पाहिजे. मी पसरणाऱ्या ह्या जाळ्यांत जर हें सावज माझ्या अटकळीप्रमाणं अडकलं, तर माझा कार्यभाग हां हां ह्मणतां सिद्धीस जाईल. वैजनाथला रेसचा नाद असल्यामुळं तो पैशांच्या टंचाईत नेहमीं असणारच. तेव्हां हा माझा डाव बहुतकरून हुकणार नाहीं. पाहूं तर या जम

कसा बसतो तो ! ( खिशांतील शंभर रुपयांची नोट टेबलावर ठेवतो व वैजना-याला हांक मारतो. वैजनाथ प्रवेश करतो ) वैजनाथ, मला कांहीं जरूरीच्या कामा-करितां बाहेर जायचं आहे, मी परत येईपर्यंत एथून कुठं हालूं नकोस समजलास ?

( जातो. )

**वैजनाथ**—उद्यांचा तर शनिवार आणि खिशांत एक दमडी नाहीं ! टीप असली मारु मिळाली आहे ! घोडा अगदीं नक्की येणार ! ह्यावेळीं कुठं पांच रुपये मिळतील तर काय बहार होईल ! पण कुठं मिळणार ? ( विचार करून आसपास पाहूं लागतो. त्याचं लक्ष टेबलावर जातें ) पण हें काय ! काय ! शंभर रुपयांची नोट ! बस्स ह्याला बोलतात नशीब ! लक्ष्मी पायांपाशीं चालून येते ती अशी ! परमेश्वर संकटांत सहाय्याला धांवून येतो ह्या गोष्टीवर माझा अद्यापि भरं-वसा नव्हता ! अरे, पण बोलण्याच्या नादांत हें भलतंच काय करीत आहें मी ? कोणी पाहिलं तर ! ( नोट खिशांत घालतो ) ( कांहीं वेळानं कृष्णराव प्रवेश करतो व टेबलावरील कागद तपासूं लागतो ).

**कृष्णराव**—वैजनाथ ?

**वैजनाथ**—साहेब.

**कृष्णराव**—मी बाहेर गेल्यावर ह्या खोलीत कोणी आलं होतं ?

**वैजनाथ**—कोणी नाहीं साहेब.

**कृष्णराव**—ह्या टेबलावरील कांहीं वस्तू तू उचललीस ?

**वैजनाथ**—कोणी मी ! बिलकूल नाहीं साहेब, आपल्या हुकमाप्रमाणं मी ह्या जागेवरून मुळीं सुद्धां हललों नाहीं.

**कृष्णराव**—खरं सांगतोस हें ?

**वैजनाथ**—वाटेल ती शपथ घेऊन, साहेब.

**कृष्णराव**—धडधडीत खोटं बोलतोस ! वैजनाथ, मी एथून जाण्यापूर्वी शंभर रुपयांची नोट ह्या टेबलावर विसरून गेलों. तुझ्याच सांगण्याप्रमाणं जर ह्या खोलींत दुसरं कोणी आलं नाहीं, तर मग ती नोट जावी कुठं ? नोट, टेबल आणि तूं ह्या दोघांपैकीं एकाजवळ असलीच पाहिजे. पण ज्या अर्थी नोट टेबलावर नाहीं त्या अर्थी ती तुझ्यां खिशांत असलीच पाहिजे. वैजनाथ, चोरी मुकाट्यानं कबूल कर आणि नोट हजर कर.

**वैजनाथ**—साहेब, आपण हें अगदीं माझ्यावर कुभांड घेतां! मी आपली नोट गोरी कां काळी ती पाहिली सुद्धां नाहीं. अगदीं आपली शपथ, आपणच कोणीकडे विसरला असाल!

**कृष्णराव**—वैजनाथ, मी जाण्यापूर्वी नोट टेबलावर होती ह्याबद्दल मुळींच संशय नाहीं. आतां ती तुझ्या खिशांत आहे ह्याबद्दलही मला मुळींच संशय नाहीं. वैजनाथ बोल चोरी केलीस कीं नाहीं!

**वैजनाथ**—साहेब, आपण विनाकारण माझा संशय घेतां, मी खरोखर आपल्या नोटीला हात लावला नाहीं.

**कृष्णराव**—वैजनाथ, तूं पक्का बिलंदर दिसतोस, पण तुझे हे लपंडाव माझ्याजवळ बिलकूल चालणार नाहींत. ( टेबलवरील कॉलबेल वाजावितो. गुरखा प्रवेश करतो. ) वैजनाथ, बोल! नोट काढून देतोस का पोलिसला बोलावूं?

**वैजनाथ**—आपण माझा निष्कारण छळ करतां, नोट खरोखर माझ्या-जवळ नाहीं.

**कृष्णराव**—तुझ्याजवळ आहे किंवा नाहीं हें आतांच कळेल, गुरखा, पोलि-सला बोलाव.

**रामजी**—अच्छा साब ( जाऊं लागतो. )

**वैजनाथ**—( एकदम कृष्णरावचे पाय धरतो ) साहेब माफ करा माझ्या हातून गुन्हा झाला. आपण मला वाटेल ती शिक्षा करा पण मेहेरबानी करून मला पोलिसच्या ताब्यांत देऊं नका.

**कृष्णराव**—चल ऊठ आणि नोट कुठं आहे ती बाहेर काढ ( वैजनाथ खीशावून नोट काढतो ) रामजी, ही शंभर रुपयांची नोट वैजनाथच्या खिशांत सांपडली ह्याला तूं साक्षीदार आहेस, प्रसंग पडला तर तुला कोर्टांत त्याप्रमाणें साक्ष द्यावी लागेल समजलास! वैजनाथ, हा चोरीचा मुद्देमाल तुझ्याजवळ सांप-डला ह्याची साक्ष द्यायला हा रामजी इथं हजर आहे, मग बोल आतां तुझ्यावर फौजदारी कां करूं नये!

**वैजनाथ**—साहेब मी आपल्या पाया पडतो; माझ्याजवळून गुन्हा झाला खरा; पण एकवार क्षमा करा. आपण मला वाटेल ती शिक्षा करा. पण पोली-

सच्या ताब्यांत देऊं नका. गरिबावर दया करा आणि एवढा अपराध पोटांत घाला. आपण क्षमा केल्याशिवाय मी आपले पाय सोडणार नाहीं.

**कृष्णराव**—वैजनाथ ऊठ, एकवार तुला क्षमा केली आहे पण तूं चोरी केली आहेस त्याबद्दल कबूली जबाब लिहून दिला पाहिजे. आहे त्याप्रमाणें लिहून देण्याची तुझी तयारी ?

**वैजनाथ** आपण ह्मणतां त्या प्रमाणें कबूली जबाब लिहून द्यायला मी तयार आहे. पण साहेब आपण कबूली जबाब लिहून घेऊन तो पोलीसकडे पाठविणार कीं काय ?

**कृष्णराव**—ह्या वेळेला नाहीं.

**वैजनाथ**—मग केव्हां ?

**कृष्णराव**—पुन्हा जर तूं असा गुन्हा केलास, तर मात्र हा कबूली जबाब कोर्टा पुढं हजर करण्यांत येईल. वैजनाथ, त्या कबूलीजबाबावर सही कर ( वैजनाथ सही करतो ) रामजी, तुझ्या समक्ष वैजनाथनें हा लेख लिहून दिला आहे ह्याबद्दल साक्षीदार म्हणून तूं इथं सही कर आणि आपल्या कामाला जा. ( रामजी सही करतो व जातो ). वैजनाथ, तूं चोरी केल्याचा हा कबूली जबाब माझ्या जवळ आहे हें लक्षांत ठेव; जर पुन्हां तुझ्या कडून अशा प्रकारचा गुन्हां घडला, अगर कामात कोणत्याही प्रकारची कसुर झाली तर तुला ह्या कबुली जबाबावर तुरुंगांत खेचलं जाईल हें पक्कें लक्षांत ठेव. आणि ह्या पुढं माझा कोणताही हुकूम तूं निमुटपणं मान्य केला पाहिजेस हेंही ध्यान्यांत ठेव. ( वैजनाथ जाऊं लागतो त्यास ) वैजनाथ हं घे ( पांच रुपयांची नोट देतो. )

---

## प्रवेश २ रा.

[ सगुणा प्रवेश करते ]

**सगुणा**—इतका वेळ झाला तरी अजून घरीं कसे येत नाहींत. ! पण आजचा वार कोण ! शनिवार ! मग त्यांना आज घर कसलं आणि दार कसलं ! आज त्यांच्या अंगांत महा लक्ष्मीचा संचार झाला असेल. मी परोपरीनं सांगून




वैजनाथ:—खिशांत पैसे आहेत, म्हणून तर हा साहेबी थाट ! (पृष्ठ—२९)

पाहिलं पण त्यांचा हा भिकार नाद सुटत नाहीं. आमच्या संसाराचं कांहीं धड लक्षण दिसत नाहीं.

पद ७

**अदया हृदयांतुनी। प्रेमभाव नच अणुहि उमटला॥ धृ॥ सुपथ मळविला व्यसनी जाणुनी। कांता कथिते मनिची हानी १॥**

अगोदरच गरिबीचा संसार आणि त्यांत रेस सारखं भयंकर व्यसन, मग हातांत नारळाची आई येण्याला कितीसा वेळ लागणार!

**वैजनाथ**—( प्रवेशून ) काय म्हणालीस हातात नारळाची आई येईल! काय बिशाद लागले, हातांत नारळाची आई येईल? अग आज माझ्या हातांत लक्ष्मी खेळत आहे!

**सगुणा**—काय लक्ष्मी खेळत आहे?

**वैजनाथ**—तुला खोटं वाटतं? मग हा पहा प्रत्यक्ष पुरावा.( खिशांतील नोटा काढतो ) झाली आतां तुझी खात्री! आज हा वैजनाथ, रोख शंभर रुपयांचा सावकार आहे.

**सगुणा**—आज आहे तरी काय हे? खिशात इतके पैसे आणि हा साहेबी पोशाक!

**वैजनाथ**—अग खिशांत इतके पैसे आहेत म्हणूनच हा साहेबी थाट केला आहे. पैसा हातांत आला कीं माणसानं जरा रुबाबांत राहिलं पाहिजे समजलीस!

**सगुणा**—पण आज हे इतके पैसे आले कुठून?

**वैजनाथ**—हं असं विचार म्हणजे सांगतो. काय म्हणालीस पैसे आले कोठून? पैसे उगाच येत नसतात! लक्ष्मी अनुकूल करून घेण्याला माणसाला तसंच साहस करावं लागतं. आज ही लक्ष्मी मी साहसानं जिंकली आहे. धाडसानं काबीज केली आहे समजलीस!

**सगुणा**—म्हणजे. कोणाच्या खिसा–पाकिटांवर धाड घातलीत कीं काय!

**वैजनाथ**—काय खिसा पाकिटांवर धाड! सगुणे तुला कळत नाहीं तें हेंच. खिसा–पाकिट कातरणं हें धाडसाचं काम मुळींच नाहीं. तीं एक कला आहे! अग हे पैसे, मी राजरोस पणं उघडया मैदानावर, हजारों लोकांसमक्ष, माझ्या अक्कल हुशारीनं आणि कर्तबगारीनं कमावले आहेत. तूं म्हणतेस रेसचा नाद

वाईट, पण आज नुसत्या पांच रुपयांवर मी शंभर रुपयांचा धनी होऊन बसला आहे. आतां ह्या शंभर रुपयांचे हजार रुपये होणार आणि हजार झाले म्हणजे मग दहा हजार होण्याला किती वेळ लागणार ? आणि माझ्या नशीबाची रद्दी जोरावर असली तर दहा हजाराचे दहा लाख सुद्धां होतील समजलीस !

**सगुणा**—लाख होण्याचं राहील बाजूला पण जें कांहीं जवळ असेल तें सगळं खाक मात्र होईल ! आज इतके दिवस, मी तुमच्या कानीं कपाळीं सारखी ओरडत आहे, पण तुमचे डोळे अजून कसे उघडत नाहींत ?

**वैजनाथ**—काय करायचं आहे डोळे उघडून ! नुसतें डोळे उघडून कांहीं उपयोग नाहीं, नशीब उघडलं पाहिजे समजलीस ! ह्या भिकार कारखान्यांत वर्षे न वर्षे राबून कधीं आपलं नशीब उघडेल कां ? अग तूं आतां मला नांव ठेवतेस, पण आजच्यासारखा माझ्या नशीबाचा घोडा जर सारखा दौडत राहिला, तर आज कारखान्यांत मजूर असलेला वैजनाथ थोडक्यांच दिवसांत कारखान्याचा मालक होईल । भिकार चाळींत राहाणारा हा वैजनाथ वाळकेश्वरच्या हवेलींत ऐषआरामांत लोळत असलेला तूं पाहशील आणि माझ्या नशिबाची रद्दी जर अशीच चढत्या जोरांत राहिली तर सगुणे रस्त्यांतून पायीं खडणारा हा तुझा वैजनाथ आपल्या ह्या राणीसह मोटारींतून मिरवीत चाललेला तूं पाहशील !

**सगुणा**—मोटारींतून फिरण्याचं तुमच्या आणि माझ्या नशिबीं तर कधीं नाहींच येणार, पण आज तुमचं डोकं फिरलेलं पाहण्याचं मात्र माझ्या कपाळीं आल आहे ! ह्या तुमच्या दुष्ट व्यसनानं आपल्या संसाराचा सत्यानाश होणार हें मला स्पष्ट दिसत आहे. रेसमध्यें पैसे मिळवून किती लोकांनीं हवेल्या उठविल्या आहेत ? रेसमध्यें पैसे कमावून कितीसे लोक कारखान्यांचे मालक झाले आहेत ? उलट रेसच्या नादाला लागल्यामुळं हवेली वाल्यांन ्हाय हाय करीत बसण्याची पाळी आलीं आहे आाण कारखान्याच्या मालकांना, मजुराप्रमाणं राबण्याचा प्रसंग आला आहे. हें पहा आपल्याला हवेलींत रहायला नको आणि मोटारींत मिरवायलाही नको. काबाडकष्ट करून जी आपल्याला भाजी भाकर मिळेल त्यांतच आपण सुखासमाधानानं राहूं, पण संसाराची धूळधाण करणारा हा रेसचा नाद सोडून द्या, एवढंच माझं हात जोडून मागणं आहे. मग आतां पुन्हां रेसला नाहींना जाणार ? द्या पाहूं वचन ?

**बैजनाथ**—सगुणे, तुझ्या ह्या मागणीचा विचार करीन इतकं वचन तुला मी सध्यां देतों मग तर तुझी हरकत नाहीं ! कोणत्याही गोष्टीचें वचन देण्यापूर्वी, माणसानं दूरवर विचार केला पाहिजे. हे पहा, मोलमजूरी करण्याची रोजची कर्मकटकट आपल्या कपाळीं आहेच, पण आज माझा खिसा आहे थोडा गरम, तेव्हां आजच्या दिवस तर मौज करूं चल. सिनेमा नाटक अगदीं आज जिवाची मुंबई करून टाकूं ! हा पहा मी असाच टॅक्सी घेऊन येतो. तूं अगदीं नटूनसजून तयार रहा बरं !

पद ८ ( लावणी )

**रुका वाजे खळखळा । आषुक माषुकांचा मेळा । घालुनि गळ्यांमाधें गळा ॥ धृ ॥ घरीं प्रेमळ गुणसुंदरी । मुलखाची अरसिक परी । दिल कसा जमावा तरी । नटणं थटणं उल्लू बनणं । फॅशन ही आजला । लाडके लगबग जाऊं चला ॥ १ ॥**

---

## प्रवेश ३ रा

( हॉलमध्यें मधुकर वाचीत बसला आहे आनंदराव प्रवेश करतो )

**आनंदराव**—मग काय मधुकर तुझा निश्चय कायम आहे ?

**मधुकर**—आनंदराव माझा विचार मी तुला अगोदरच कळविला आहे. मजुरांची स्थिती सुधारणं हेंच मी माझ्या आयुष्याच ध्येय ठरविलं आहे.

पद ९ ( दुर्गा त्रिताल )

**लतिका डोले वारियानें हाले । प्रेमळ जन रमवाया रे ॥ धृ ॥ दया दिन जना परीना दिसे । नच शांति पथा येते ॥ १ ॥**

**आनंदराव**—"विनाश काले विपरीत बुद्धि!" असं ह्मणतात तें कांहीं खोटं नाही. मधुकर तुला ही कसली दुर्बुद्धि आठविली आहे ? मजुरांच्या नादीं लागून तू मात्र मजूर झाला आहेस ! हें मजुराचं खुळचट वेड जर तुझ्या डोक्यांत शिरलं नसतं, तर आज ! तूं भय्यासाहेबांचा जावई झाला असतास आणि दोन दिवसांनीं त्यांच्या सर्व इस्टेटीचा मालक झाला असतास ! कनक आणि कांता ह्यांच्या प्राप्तीसाठीं आज पर्यंत किती महात्म्यानीं आपले जीव सुद्धां धोक्यांत घातले

आहेत ! आणि वसिष्ट विश्वामित्रांसकट अखिल विश्वाला वेड लावणाऱ्या ह्या वल्ली तुझ्या पुढं चालून आल्या असतां तूं त्याच्या धिःकार केलास तेव्हां तुझ्या शहाणपणाला काय म्हणावं ? दुसरं काय ह्मणायचं ! चोराच्या नादीं लागणारा चोरेच होणार ! दारुबाजाच्या नादीं लागणारा दारुबाज होणार त्याचप्रमाणें मजुराच्या नादी लागणारा मजूरच होणार.मधुकर आजून तरी डोळे उघड, माझं ऐक हा मजुराचा नाद सोडून दे नाहीतर तुलाच एकादे दिवशीं मजुरी करण्याची पाळी येईल ! भय्यासाहेबाकडे परत जा, त्यांची क्षमा माग, त्यांचा कारखाना ताब्यात घे आणि तुझ्यासाठी झुरत असलेल्या त्यांच्या मुलीला पदरात घे. पहा तुझ्या कल्याणाचा अचूक मार्ग मी तुला दाखविला आहे.

पद १० ( यमन कल्याण एकताल )

**नाभिं शीतल चंद्रीकेंत । रजनिकांत हंसत आला । कमलिनि बहु झुरत मनी । भ्रमर कसा दूर असा ॥ धृ ॥ विसरुनि परि अति कटुता । हृदयिं अतां धरिं समता ॥ १ ॥**

**मधुकर**---आनंदराव, माझ्या कल्याणाचा मार्ग तूं मला इतक्या कळक-ळ्यांनं दाखविलास ह्याबद्दल मी तुझा अत्यंत आभारी आहे, परंतु तो मार्ग मला स्विकारता येत नाहीं ह्याबद्दल मला फार दिलगिरी वाटतें.

पद ११ ( काफी त्रिताल )

**माया मोठी । प्रेमासाठीं मन व्याकुळ होतें ॥ धृ ॥ चंद्रबिंब तें रम्य खचित परि । अरासिक मन तिथ नच रमतें ॥ १ ॥**

आनंदराव, समाजाच्या कल्याणासाठी कांहीं व्यक्तींनी तरी आयुष्यांचं एक विशिष्ठ ध्येय ठरविलं पाहिजे. ( तारा प्रवेश करते ) आणि एकदा ध्येय ठर-विल्यावर मग तें सिद्धिस नेण्याच्या मार्गांत कितीही दारुण संकटें आली तरी त्यांच्याशी झगडण्याला तयार झालं पाहिजे.

**तारा**---मधुकर, तुमचं ह्मणणं मला बरोबर पटतं. प्रत्येक विचारी मनुष्यानं आपल्या आयुष्याचं कांहीं तरी ध्येय ठरविलं पाहिजे.

**अनंदराव**---लाखाचे बोल बोललांत ह्यावेळी तुम्ही ! इतके सुंदर उद्गार तुमच्या सुंदर मुखांतून कधींच बाहेर पडले नव्हते ! आतां सुंदर मुखांतून सुंदर

उद्गार पडणं हा अपवादच असतो ह्मणा ! " प्रत्येक मनुष्याचं कांहींतरी ध्येय असलंच पाहिजे. " खरोखर किती मार्मिक आणि समंजसपणाचे उद्गार ! पण सगळ्यांत बहारीचा शब्द "कांही ! तरी " "काही तरी" शब्दांत अशी कांहीं जादू आहे कीं तो शब्द ऐकणाराची अक्कलच गुंग होऊन जाते " कांहींतरी ध्येय " हे मात्र तुमचे उद्गार अगदी खरे आहेत. कांहींतरी बोलणं कांहींतरी करणं कांहींतरी चालणं असंच जेथें आपल्यापैकीं बहुतेकांच कांहींतरी आयुष्य चाललं आहे. तेथें ह्या कांहींतरी आयुष्याचं कांहीतरी ध्येय असणं हें उघडच आहे !

**तारा**—कांहीं माणसांना, वेळीं अवेळीं आपल्या अकलेचं प्रदर्शन करण्याची संवयच जडलेली असते. ज्यांना शब्दाचा अर्थसुद्धां कळत नाहीं त्यांनीं उगाच वादविवादाच्या भानगडींत तरी कशाला पडावं ?

**आनंदराव**—मधुकर हा हल्ला तुझ्यावर आहे! मधुकर, खरोखर वेळींअवेळीं आपल्या अकलेचं प्रदर्शन करणं ही फार घातकी संवय आहे !

**तारा**—कांहींतरी ध्येय म्हणजे एक विशिष्ट ध्येय असा माझ्या म्हणण्याचा अर्थ होता, पण प्रत्येक गोष्टीचा उपहास करणं हेंच ज्यांच्या आयुष्याचं ध्येय त्यांच्याजवळ ध्येयवादाच्या गोष्टी बोलून काय उपयोग? आणि मी हें मधुकराबद्दल बोलत नाहीं तर आपल्याबद्दल बोलते समजलं का ?

**आनंदराव**—आपले हे उद्गार जर माझ्यासंबंधीं असतील तर त्याबद्दल कीवच करायला पाहिजे. माझा आणि आपला इतक्या दिवसाचा परिचय असतां माझ्या आयुष्याचं काय ध्येय आहे ह्याबद्दल आपलं इतकं अगाध अज्ञान असावं हें खरोखर आपलं दुर्दैव !

**तारा**—माझ्या दुर्दैवाबद्दल आपल्याला इतकं दुःख करण्याचं मुळींच कारण नाहीं. सांगा पाहूं आपल्या आयुष्याचं कोणतं ध्येय आहे ते !

**आनंदराव**—माझा स्वभाव इतका भिडस्त आहे कीं, मी स्वतःबद्दल कोणत्याच बाबतींत, दुसऱ्याजवळ तर राहुंद्याच ! पण स्वतःजवळ देखील कांहीं बोलत नाहीं, पण आपण इतक्या प्रेमानं, कळवळ्यानं, आपलेपणानं मला विचारतां—

**तारा**—अडलं आहे माझं खेटर अगदीं प्रेमानं कळवळ्यानं आणि आपलेपणानं विचारायला ! तुमच्यासारख्या खुशालचंदु माणसाचें काय ध्येय असणार तें दिसतंच. तुमची वटवट ऐकण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं.

**आनंदराव**—हें तुम्हीं नुसतं तोंडानं म्हणतां, पण माझं ध्येय काय आहे हें ऐकण्याची तुमची अगदीं अंतःकरणांपासून इच्छा आहे, हें मला पुरं माहित आहे, म्हणून म्हणतो, तुम्हीं इतक्या प्रेमानं विचारतां, तेव्हां तुमची निराशा कशी करूं ?

**तारा**—हं मग पडूंद्या एकदां मुक्ताफळं बाहेर.

**आनंदराव**—पहा विचारलंत शेवटीं ! माझं म्हणणं खरं झालं कीं नाहीं अखेर मधुकर ! स्त्रियांच्या अंतःकरणाचा ठाव कसा घ्यावा ही कला मी बेमालूम साध्य करून घेतली आहे ! बरं जाऊं द्या. माझ्या आयुष्याचं एकच ध्येय आहे आणि तें ध्येय म्हणजे सौंदर्याची उपासना !

**तारा**—झालं ! शेवटीं अकलेचे तारे तोडलेत ! कांहीं माणसांना स्वतःच्या अकलेचं प्रदर्शन करतांना लाजच वाटत नाहीं. ध्येय काय म्हणे तर सौंदर्याची उपासना ! आम्हां बायकांच्या सौंदर्याची उपासना करायला तें जसं कांहीं अगदीं वाटेवरच पडलं आहे नाहीं ?

**आनंदराव**—आतां माझ्या अकलेचं प्रदर्शन होण्याऐवजीं आपल्या अकलेचं मात्र खास प्रदर्शन झालं आहे. मी सौंदर्याचा उपासक आहे म्हणजे स्त्री सौंदर्याचा भक्त आहे असं आपल्याला कोणी सांगितलं ? सौंदर्याचा मक्ता फक्त स्त्रियानाच दिला आहे अशी का आपली समजूत आहे ? अरेरे तुमच्या ह्या अवाढव्य अज्ञानाची मला कींवच करावीशी वाटते.

## पद १२

**प्रेमला विमला नव रंगरसहि सेवेला। तनुलता कुसुम सम एक रमणि देहाला॥ धृ॥ चारुता कोमलता कोण तुळिल सुरुपातें। मानिती सुजन बहुमोल सुमन समुदातें॥ १॥**

सृष्टीच्या सौंदर्यापुढं तुमच्या स्त्रीसौंदर्याची काय मातब्बरी आहे ? कलेमध्यें काय कमी सौंदर्य आहे ? प्रतिभाशाली कवींच्या काव्यांत जें सौंदर्य असतं त्याच्या पुढं तुमच्या स्त्रीसौंदर्याचा काय पाड आहे ? सृष्टीचं, कलेचं आणि काव्याचं सौंदर्य चिरंजीव आहे पण तुमच्या स्त्री जातीचं सौंदर्य अगदींच अल्पायुषी आहे. वाईट वाटून देऊं नका. तुम्ही आपल्याला असा ! सृष्टी सौंदर्याचा आणि कला

सौंदर्याचा जसा मी भोक्ता आहे त्याचप्रमाणं स्त्री सौंदर्याचाहि मी चाहाता आहे. तुह्मी काय कमी सुंदर आहात ! हें तुमचं नाक कसं अगदीं सिगारेट प्रमाणें सरळ आहे ! डोळे कसे अगदीं शाईप्रमाणें काळेभोर आहेत आणि आठ कसे शेंदराप्रमाणें लाल आहेत !

**तारा**—बस्स करा तुमची वटवट.तुमचं हें सौंदर्य वर्णन ऐकून घेण्याची माझी मुळीच इच्छा नाही. काय म्हणे नाक कसं सिगारेट प्रमाणें सरळ आहे ! त्या तुमच्या दीड दमडीच्या सिगारेटशीं माझ्या नाकाचीं तुलना करतांनां तुह्मांला कांहीं तरी शरम वाटायला पाहिजे होती ! कांहीं माणसं अगदींच बेहोष कशीं बनतात ह्याचं मला आश्चर्य वाटंत !

**आनंदराव**—सौंदर्य मद्याचा प्याला पुढं आल्यावर कोण बेहोष होणार नाहीं !

**तारा**—आतां तुह्मीं एथून जातां की मी चालती होऊं !

**आनंदराव**—छे छे ! भलतच ! तुम्हीं ही जाऊं नका आणि मीहि जात नाही ! खुशाल आपण आनंदानं दोन घटका बोलत बसूं. काय मधुकर तुझं काय मत आहे !

**मधुकर**—हा तुमचा दोघांचा प्रेम कलह आहे. अशा वेळीं त्रयस्थानं बसणं उचित नाहीं, तेव्हां मीच एथून जावं हें योग्य (जाऊं लागतो)

**आनंदराव**—शाबास तू खरा दूरदर्शी आहेस मधुकर !

**तारा**—मधुकर आपल्याला जाण्याचं मुळींच कारण नाहीं. आपण त्यांचं—आनंदरावांचं काय ऐकतां ?

**आनंदराव**—त्यांचं म्हणालांत तेंच ठीक होतं.

**तारा**—माथेफिरू माणसाशीं बोलण्याची माझी मुळीच इच्छा नाही. मधुकर आपल्याला इथं बसलं पाहिजे.

**आनंदराव**—मधुकर आपल्याला इथं बसण्याचा हुकूम होत आहे तेव्हां तो आपल्याला निमुटपणं मान्य केलाच पाहिजे !

**तारा,**—मी मधुकरांना बसण्याला सांगितलें, तुम्हाला नाही समजलांत ! तुम्ही बेलाशक चालते व्हा ! आता बाबा आले म्हणजे त्यानां स्पष्ट सांगते कीं (नानासाहेब येतात).

**नानासाहेब**—( प्रवेशून ) काय तारा तू काय स्पष्ट सांगणार आहेस ?

**आनंदराव**—दुसरं काय नानासाहेब कीं त्यांची आतां ह्या घरांत राहाण्याची मुळीच इच्छा नाही.

**तारा**—तुमच्या जिभेला हाड आहे कीं नाही ? बाबा ह्यांचा वात्रटपणा आज बेमर्याद झाला आहे. मला तो ऐकून घेण्याची मुळीच इच्छा नाही, मी आपली जात्ये एथून.

**आनंदराव**—माझीहि फिरायला जाण्याची वेळ झाली आहे, बरोबरच जाऊं आपण !

**तारा**—एक शद्ब बोलू नका माझ्या जवळ.

**आनंदराव**—हृदयाची हृदयाशी ओळख पटल्यावर, मग शद्बांची वायफळ बडबड कशाला ! अगदीं एक अक्षरसुद्धां न बोलतां बरोबर जाऊं ! मग तर झालं ! ( तारा जाते ) हं जरा थांबा ! I beg your pardon अगदीं सपस्होल माफी मागतो. निदान नाटकातल्या नायिके प्रमाणं एक तरी नेत्र कटाक्ष फेका की ! गाडं बेफाम बिथरलेलं दिसतं, आता समजुत घालता घालता माझे प्राण कासावीस होणार. नानासाहेब, मधूकर Good day मला एक अर्जंट अपॉइंट मेंट आहे ( जातो )

**नानासाहेब**—आनंदराव ही एक विनोदीवल्ली आहे. मनुष्य अंतःकर णाचा प्रेमळ आहे. चर्चेचा विषय कितीही गंभीर असला तरी असली माणसं त्याच्याकडे नेहमी विनोदी दृष्टींन पाहतात. एकाद्या स्नेहाच्या किंवा आप्ताच्या संकटाच्या वेळीं मात्र अशा माणसांच्या अंतःकरणाचा थांग लागतो. बरं मधुकर आतां आपल्या कामा संबधानं बोलूं मजुरांची स्थिती सुधारण्याकरितां कारखा-न्याच्या मालकांनीं कोणत्या दिशेनं प्रयत्न केले पाहिजेत ? कां कारखान्याचे मालकच मुळीं नको असं तुमचं मत आहे ?

**मधुकर**—कारखान्यांचे मालक नको असं माझं मुळींच मत नाहीं. मला कारखान्यांचे मालकही पाहिजेत आणि मजूरही पाहिजेत. कारखान्याचा सारा फायदा मजूरांना मिळावा आणि मालकांनीं हात चोळींत बसावं, मजूरांना मलिदा आणि मालकांच्या हातांत नारळाची आई असं माझं मुळींच मत नाहीं. कार-खान्याच्या मालकांनीं आपला पैसा कारखान्यांत गुंतवला आहे, त्याबद्दल त्यांना




कृष्णराव :—चल ऊठ आणि नोट कुठं आहे ती बाहेर काढ. ( पृष्ठ— २३ )

योग्य मोबदला मिळाला पाहिजे. माझं म्हणणं एवढंच कीं, मालकांनीं स्वतःच सगळा फायदा गिळंकृत न करतां, त्याचा कांहीं भाग तरी त्यांनीं मजूरांची स्थिति सुधारण्याकडे खर्च केला पाहिजे. मालकांनीं खुशाल मोटारींतून फिरावं, माझी त्याला मुळींच हरकत नाहीं, पण मजूरांनां मोकळ्या हवेंत फिरायला कांहींतरी वेळ मिळेल अशी काळजी त्यांनीं घेतली पाहिजे. मालकांनीं बेलशाक बादशाही बंगल्यांत रहावं, माझी मुळींच ना नाहीं, पण मजूरांनां त्यांच्या झोंपड्यांत हवा आणि प्रकाश मुबलक मिळेल अशी खबरदारी त्यांनीं घेतली पाहिजे. मालकांनीं मनमुराद पक्वान्नें झोडावींत. माझी मुळींच तक्रार नाहीं, पण मजूरांना मजूरी करण्याला अंगांत धमक राहील अशा प्रकारचं अन्न मिळालं पाहिजे अशी तजवीज त्यांनीं केली पाहिजे.

**बाबासाहेब**—कारखान्यांच्या मालकांनीं मजूरांबद्दल सर्व प्रकारची काळजी घ्यायची तर त्याचप्रमाणं मजूरांनीं मालकाच्या हितासाठीं झटणं अवश्य नाहीं का?

**मधुकर**—अलबत्. अवश्य आहे. मालक जर अशाप्रकारं मजूरांबद्दल काळजी घेतील तर मजूरानीं मालकाबद्दल तशीच कळकळ दाखविली पाहिजे. मालक जर मजूरांच्या कल्याणासाठीं झीज घेतील तर मजुरांनींसुद्धां मालकांच्या हितासाठीं आस्थेनं खपलं पाहिजे. कारखाना आपला आहे, मालकांचा फायदा म्हणजे आपला स्वतःचा फायदा अशा भावनेनं त्यानीं काम केलं पाहिजे. कारखाना भरभराटीस आणण्यासाठीं अंग कसून त्यांनीं मेहनत घेतली पाहिजे. कामाच्या वेळांत कुचराई न करतां, मालकाची कसोशीनें नोकरी केली पाहिजे. माझं म्हणणं एवढंच कीं, जी आस्था आणि जी कळकळ मालकांनीं मजूरांबद्दल दाखवायची, तीच आस्था आणि तीच कळकळ मजूरांनीं मालकांबद्दल दाखविली पाहिजे.

**नानासाहेब**—मधुकर, तुमच्याप्रमाणेंच माझे विचार आहेत आणि तुमच्या विचारांना अनुसरूनच मजूरांच्या सुखसोईची मी एक योजना तयार केली आहे पण माझी इच्छा अशी आहे कीं, माझ्या कारखान्यांतील मजूरांप्रमाणें इतर कारखान्यांतील मजूरांचाही फायदा व्हावा, म्हणून माझे प्रतीनिधी ह्या नात्यानें तुम्ही, भय्यासाहेब व इतर कारखान्यांचे मालक ह्यांची भेट घ्या आणि त्यांच्या

पुढं माझी योजना मांडून त्यांची संमती ह्या कार्याला कितपत मिळेल तें पहा; इतकं मात्र आश्वासन मी तुम्हांला देतों कीं, दुसऱ्या मालकांचीं संमती मिळो अगर न मिळो, माझ्या योजनेला माझ्या कारखान्यांत तरी मी खास मूर्त स्वरूप देईन !

**मधूकर**—नानासाहेब, मजूरांच्या कल्याणाबद्दल आपण जी कळकळ दाखविली त्याबद्द मी आपला अत्यंत आभारी आहे. मी स्वतः व्यक्ति म्हणून भय्यासाहेबाच्या घराची पायरी न चढण्याचा निर्धार केला. होता पण आपला प्रतिनिधी ह्या नात्यानं भय्यासाहेबांकडे जाण्यास माझी मुळींच हरकत नाहीं

पद १३ (सुगराई एकताल)

**हा मम जरि स्वाभिमान। प्रगट होई या समया। तिळ न मनीं समाधान॥ धृ॥ तव वच मजला त्याहुनि प्रियतर। सांडुनि परि मम भावा। यथा शक्ति तुजसि सुखवीन॥ १॥**

---

## प्रवेश ४ था

(विश्वनाथ प्रवेश करतो)

**विश्वनाथ**—(अभंग म्हणत येतो), जिवाचा आणि जगाचा आतां अगदीं कंटाळा आला आला आहे. वेड्याच्या वेशांत इतके दिवस वावरत राहिल्यामुळं, मी खरोखरच वेडा होतो कीं काय अशी मला भीति वाटते, पण अहोरात्र असह्य वेदनानीं हृदय विदीर्ण होण्यापेक्षां, रात्रं दिवस संतापाच्या घाणींत ज्वाला मस्तकांत भडकत राहण्यापेक्षा, रात्रं दिवस सूडाचा थैतान अंतःकरणांत थैमान करीत राहण्यापेक्षा वेड लागलेलं काय वाइट ! वेडा होणं माझ्या हातांत नाहीं; पण जिवाला होत असलेल्या यातनाचा शेवट करणें माझ्या हातात आहे. जड झालेलं हें जिवाचं जूं मला आत्तां झुगारून देतां येईल. टाकूं कां आतां कायमचा निकाल लावून ! पण नाहीं माझा कायमचा निकाल लावून टाकण्यापूर्वी एका नराधमाचा ह्या जगांतून नायनाट करायचा आहे हें मला विसरतां कामा नये. त्यानीच चांडाळाची आठवण झाली म्हणजे पायाची आग मस्तकांत जाते आणि त्या आगीच्या भडक्यान मस्तक

ताडकन फुटून जाईल कीं काय असे मला वाटतं. त्या नराधमाचा ( कृष्णराव-येत असलेला पाहून ) तोच पाजी नीच चांडाळ इकडे येत आहे ! असाच जाऊन त्या चांडाळाच्या नरडीचा घोट घेऊं कां ? नामी संधी आली आहे, टाकतो एकदा कायमचा मोक्ष करून! पण अशा घिसाड घाईनें त्या नीचाला मारण्यांत मज नाहीं ! त्याच्या पापाचें माप त्याच्या पदरांत टाकून मग त्याला परलेकचा रस्त दाखविला पाहिजे. पण ह्या हराम खोरा बरोबर दुसरा कोण आहे ? कोण सगुणेच नवरा वैजनाथ ! दोघें कांहीं तरी कुजबुजत आहेत ! त्या चांडाळ च कांहींतरी कारस्थान घाटतं असलं पाहीजे. आपल वेड्यांचं सोंग घेउन, त्या हरामखोराचं कसल खलबत चाललं आहे तें पहावं ( जातो ) ( कृष्णराव आणी वैजनाथ प्रवेश करतात )

**कृष्णराव**—वैजनाथ, मी तुला कोणतहीं सांगितलेलं काम निमूटपणं करण्याचं तू कबूल केलं आहेस हें तुला आठवत असेल.

**वैजनाथ**—होय साहेब.

**कृष्णराव**—मग मी तुला सांगतो ती कामगिरी तूं बिनतक्रार बजावली पाहिजे.

**वैजनाथ**—पण कामगिरी कोणती तें साहेब सांगतील तर मेहेरबानी होईल.

**कृष्णराव**—कामगिरी फार नाजूक आहे. पण लक्षांत ठेव त्याबद्दल दुसऱ्या कुणाला एक अक्षर कळतां कामा नये. कामगिरी अशी आहे कीं, आपल्या कारखान्याला आग लावून द्यायची.

**वैजनाथ**—काय कारखान्याला आग लावून द्यायची ?

**कृष्णराव**—असा मोठयानं ओरडूं नको, आणि असा भेदरून जाऊं नको. कामगिरी काय आहे हें तुला कळलं, मग आतां तूं ती निमूटपणं पार पाडणार, किंवा नाहीं हें सांग पाहूं ?

**वैजनाथ**—साहेब, हे भलतंच काम काय सांगता ? छेः! आपण माझी थट्टा करतां.

**कृष्णराव**—थट्टा मुळींच नाहीं आणि भलतीसलती थट्टा करण्याचा मला मुळींच नाद नाहीं. मग बोल, मी सांगितलेलं काम पार पाडण्याची तुझी तयारी आहे किंवा नाहीं ?

**वैजनाथ**—साहेब, माफ करा. आपण सांगितलेलं काम माझ्या हातून मुळींच होणार नाहीं. कारखान्याला आग लावायची !

**कृष्णराव**—चूप, मोठयानं ओरडूं नको. वैजनाथ, मी सांगतों तुला हें काम केलंच पाहिजे.

**वैजनाथ**—मग मीही आपल्याला सांगतों कीं, हें नीच हलकट काम मी मुळींच करणार नाहीं. कारखान्याला आग लावून मी स्वतः आगींत पडूं ?

**कृष्णराव**—वेडा आहेस तूं अगदीं. तुझ्याकडून हें काम करून घेऊन, मी तुला संकटांत घालीन असं तुला वाटतं ? तूं कारखान्याला आग लावायची पण आगींत पडायचं दुसऱ्यानं असा माझा बेत आहे समजलास ? हें पहा आग लावायची तूं आणि तोहमत लादायची मधूकरवर !

**वैजनाथ**—म्हणजे पाप करायचं मी आणि त्याचं प्रायश्चित्त भोगायला लावायचं एका निरपराधी माणसाला ! असंच ना आपलं म्हणणं ?

**कृष्णराव**—माझं म्हणणं काय आहे तें मी तुला स्पष्ट सांगितलंच आहे, मी सांगितल्याप्रमाणं तूं कामगिरी बजविणार किंवा नाहीं हें सांग अगोदर.

**वैजनाथ**—माझ्या हातून हें काम बिलकूल होणार नाहीं साहेब.

**कृष्णराव**—वैजनाथ, पुरता विचार करून माझ्या प्रश्नाचा जबाब दे. तूं चोरी केल्याचा कबूलीजबाब माझ्या ताब्यांत आहे हें विसरूं नको. मनांत आणीन तर ह्या घटकेला तुझ्या हातांत बेड्या ठोकून तुला तुरुंगांत डांबून टाकीन हें लक्षांत ठेव.

**वैजनाथ**—साहेब, माझा प्राण गेला तरी बेहेत्तर ! पण स्वतः खोटं काम करून त्याबद्दल एका निरपराधी माणसाला शिक्षा भोगायला लावण्याचा नीचपणा मी कधींच करणार नाहीं.

**कृष्णराव**—बरं हें पहा तूं आग लावूं नको. कारखान्याला आग मधुकरनं लाविली एवढं सांगण्याची कामगिरी तूं कर, मग तर झालं ?

**वैजनाथ**—नाहीं साहेब, दुसऱ्याचा नाहक, घात करण्याचं हें काम मी साफ करणार नाहीं.

**कृष्णराव**—मग आतां मी काय करणार आहे तें ऐक. कारखान्याला आग ही लागणार ! आणि ही आग वैजनाथानं, तूं लावली, असं मी

सिद्ध करणार. चोरी केल्याचा तुझा कबूली जबाब माझ्याजवळ सुरक्षित आहे. हें विसरूं नको. आग लावण्याचा गुन्हां तूं केलास हें शाबीत करण्याला तुझ्या कबूली जबाबाची चांगली मदत होईल हें लक्षांत असूं दे; पण मी सांगतो त्या प्रमाणं कामगिरी बजाविलीस तर [ खिशांतून नोट काढून ] हें बक्षीस मिळेल.

**वैजनाथ**—पण साहेब—

**कृष्णराव**—पण बिण कांही नाहीं ! हें अर्धें बक्षिस आहे. कामगिरी बजावल्यावर इतकेंच बक्षीस पुन्हां मिळेल ! मग बोल तुझी तयारी आहे कीं नाहीं ?

**वैजनाथ**—पण साहेब असं करणं पाप नाहीं का ?

**कृष्णराव**—अरे कसलं पाप आणि कसलं पुण्य ! ही चालत आलेली लक्ष्मी लाथाडणं हें पाप आहे ! चल ठेव हीं नोट खिशांत ( वैजनाथ नोट घेतो इतक्यांत विश्वनाथ प्रवेश करतो व " दुर्बुद्धि ते मना । कदा नुपजो नारायण ।। " असं म्हणतो, कृष्णराव व वैजनाथ दोघेही चपापतात!) हं अरे हा वेडा! त्याला भिण्याचं कांहींच कारण नाहीं ( स्वगत ) काय असेल तें असो त्या वेड्याकडे पाहिलं म्हणजे मला एक प्रकारची भिती वाटते ( उघड ) वैजनाथ तूं इतका भेदरून कां गेलास अरे तो एक डोकं फिरलेला प्राणी आहे त्याच्याकडे लक्ष देण्याचं मुळींच कारण नाहीं. आपण आपल्या कामाला लागूं ( जातात )

**विश्वनाथ**—एकूण ह्या नीचाचें हें कुटील कारस्थान त्या बिचाऱ्या मधूकराचा बळी घेण्यासाठी आहे. ह्याची ही दुष्ट मसलत हाणून पाडलीच पाहिजे, पण ती हाणून पाडायची कशी ? लोकांच्या दृष्टीन मी तर बोलून चालून वेडा ! ह्या जगाच्या बाजारांत कधीं कधीं शाहण्या माणसांच्या शद्बांना सुद्धां कवडिचं मोल येत नाहीं ! मग माझ्यासारख्या वेड्याच्या वाणीवर कोण विश्वास ठेवणार ? ( समोर पाहून ) हे कोण येत आहेत ? मधूकरचे स्नेही आनंदराव ! एक विक्षिप्त प्राणी असा ह्यांचा बोलबाला आहे. वेड्या आणि विक्षिप्त प्राण्यांचा स्नेह लौकर जमतो असं म्हणतात, पाहूं तर या प्रयत्न करून. ( आनंदराव प्रवेश करतो त्याला उद्देशून रामराम साहेब (आनंदराव उलट रामराम करतो ) तुम्हीं मोठे विलक्षण दिसता ? वेड्या माणसानं रामराम केल त्याबद्दल त्याचा धिःकार करायचा तें टाकून त्याला तुम्हीं उलट राम राम

करतां तेव्हां काय म्हणाव तुम्हांला ? कां तुम्ही पण माझ्यासार आहांत ?

**आनंदराव**—एकूण तुह्मीं वेडे आहां म्हणतां ?

**विश्वनाथ**—मी एकटाच नाहीं म्हणत ! सगळं जग मला वेडा म्हणत सगळ्या जगानं वेड्याच्या लायकिचं सर्टीफीकेट मला दिल्यावर, मग कोणता पुरावा पाहिजे ? पण कायहो वेडी माणसं कधीं कधीं शहाण्यासारख तात हें खरं का ?

**आनंदराव**—अगदीं खरं आहे. केव्हां केव्हां नावाजलेले शहाणे धादांत वेड्या प्रमाणं बरळतात तर मग वेड्यांना कधीं कधी मजेखातर शहाण बोल बोलण्याची लहर कां येउं नये ? तुह्मांला आता तशी कांहीं लहर । दिसते. बाकी मला वाटतं, तुह्मीं जर मनात आणाल तर तुमची ही शहाण लहर कायमची टीकेल.

**विश्वनाथ**—( स्वगत ) ह्यानं माझं वेड्याचं सोंग ओळखलं तर ( उघड ) छे भलतंच ! ही शहाणपणाची लहर एकादेवेळीं मला चुकून येत पहा भय्यासाहेबांच्या कारखान्याचा मॅनेजर कृष्णराव, ह्याचा न्याला आग लावण्याचा विचार आहे आणि ती तोहमत म घालण्याचं त्याचं कारस्थान आहे. ही बातमी मला कशी ली असं तुह्मी विचाराल ! तुमचा पिशाच्यावर विश्वास आहे ? पण मी हें सारंख काय विचारतो, पण बरोबर मी वेडा ह्मणूनच असला वेडगळ प्रश्न तुमच्या सारख्या विद्वान माणसांचा परमेश्वरावर विश्वास नसतो, तो पिशा कोठून असणार ? पण तुमचा विश्वास असो अगर नसो, ही बातमी मल पिशाच्यानं सांगितलीं. बरं आह्मीं जातो आतां रामराम ( आह्मीं जातो अ गांवा असं ह्मणत जातो. )

**आनंदराव**—ही एक अजब वल्ली आहे. हा वेडा नाहीं खास. हे वे केवळ सोंग आहे. पण त्यानं आतां जी ही बातमी दिली ती अक्षरशः असली पाहिजे, कारण तो कृष्णराव महा नीच मनुष्य आहे. कोणतंही दुष्ट करण्याला तो कचरणार नाहीं. मधुकराच्या गळ्याला फांस लावण्यासाठीं हें स्थान आहे तेव्हां तें मला हाणून पाडलंच पाहिजे.

पद १४ ( बहार एकताल )

वरि वरि दावि मधुर वचनाला । जनी मोद मनीं क्रोध। करिल सकल कार्य घात । खंत नाहीं जीवा ॥ ध्रु ॥ वडवानलांत होत । अणु अणु जरि भस्मसात् । परि तशांत धैर्य देत । कोणि दावि सेवा ॥ १ ॥

---

## प्रवेश ५ वा

( हाल, भय्यासाहेब विचार करीत बसले आहेत )

**भय्यासाहेब**—मजूरांच बंड अधिकच फैलावत चाललं आहे ! आणि त्यांच्या मागण्या पाहाव्या तर त्या विचित्रच ! काय म्हणे पगारांत वाढ पाहिजे ! आज इतकीं वर्षे ह्यांच्या बापजाद्यानीं, आम्हीं देऊं त्या पगारावर नोकरी केली पण त्यांनीं कधीं पगार अपुरा म्हणून तक्रार केली नाहीं, मग ह्या शहाण्यानीं पगारांत वाढ पाहिजे असा हट्ट कां धरावा तेंच मला समजत नाहीं. ह्यांच्या पगारांत वाढ करणं म्हणजे ह्यानां चैनबाजी करण्याला उत्तेजन देणं ! ह्या लोकांच्या हातांत पैसा अधिक पडला कीं नुसते चैनी होतील इतकंच नाहीं तर आधिक व्यसनी होतील ! पगार पुरत नाहीं, ह्मणून हे मजूर कंठशोष करतात ! आणि असा कंठशोष करून घसा कोरडा पडतो, ह्मणून मग कोरड पडलेल्या घशाला ओलावा देण्यासाठीं हे दारूच्या पिठ्याकडे धांव घेतात ! दारू प्याल्याशिवाय ह्यांचा एक दिवस जात नाहीं ! जर ह्यांच्या पगारांत वाढ केली तर ह्यांचं दारू पिण्याचें प्रमाण मात्र खास वाढेल ! त्यांच्या स्वतःच्या आणि त्यांच्या बायका पोरांच्या कल्याणासाठीं तरी मजुरांच्या पगारांत बिल्कूल वाढ करतां कामा नये. आणखीं काय ह्मणे मजूरांना करमणूक पाहिजे. What an idea ! आह्मां श्रीमंताना चैन व करमणूक पाहिजे त्याचप्रमाणं मजुरांनाहीं पाहिजे असं ह्मणणं ह्मणजे Sheer nonseuse आणि आश्चर्याची, दुःखाची नव्हे शरमेची गोष्ट हीं कीं आमच्या पैकीं कांहीं दीड शहाणे मजुरांच्या ह्या विचित्र योजना आपण होऊन पुढें आणीत आहेत ! तो नानासाहेब असाच कांहीं उपद्व्याप करीत आहे पण अशा आचरटपणानं स्वतःच्याच घराला आग लागेल हें या मूर्खाला कसं कळत नाहीं ! आणि त्यानं मधुकराला हाताशीं धरलं आहे.

**मधुकर**— ( पाहून ) भय्यासाहेब !

**भय्यासाहेब**—कोण मधुकर ! तूं ह्या घरांत पाऊल देखील ठेवतां कामा नये, असं मी तुला बजावलं असतां तूं पुन्हा इथं येण्याचं धाडस करतोस !

**मधुकर**—भय्यासाहेब, आपण मला इथं न येण्याबद्दल बजावलं होतं आणि मीही आपल्या घराची पायरी न चढण्याचा निश्चय केला होता, पण आज मी आलों आहे तो मधुकर ही व्यक्ती ह्मणून नाहीं. नानासाहेबांचा प्रतिनिधी ह्मणून आपल्यापुढं हजर आहे.

**भय्यासाहेब**—I do not uuderstand this nOnsense व्यक्ति ह्या नात्यानं असो किंवा प्रतिनिधी ह्या नात्यानं असो, तूं इथं आला आहेस इतकं मला कळत आहे. तुझं तोंड पाहाण्याची माझी बिलकूल इच्छा नाहीं. तूं एथून एकदम चालता हो.

**मधुकर**—माझा सहवास आपल्याला इतका दुःसह व्हावा ह्या बद्दल मला अतिशय वाईट वाटतं मी जाण्यापूर्वी, माझं नव्हे नानासाहेबांचं काय ह्मणणं आहे तें ऐकून घेण्याची कृपा कराल तर—

**भय्यासाहेब**—I do not want to hear any damned nonsense from you. you get away from here

**मधुकर**—पण मी कोणत्या कामासाठीं आलों आहे तेवढं तरी मेहेरबानी करून आपण ऐका. नानासाहेबानीं मजूरांच्या बाबतींत कांहीं योजना—

**भय्यासाहेब**—ते नानासाहेब, आणि ती तुमची योजना you all go to hell ! मी तुला चालता हो ह्मणून पुनः पुनः सांगत असतां, तूं एखाद्या निर्लज्ज लोंचट माणसाप्रमाणं उभा आहेस तेव्हां तुझ्या बेशरमपणाची कमाल आहे. तुला ह्या पेक्षां अधीक शोभा करून घ्यायची नसल्यास तूं ह्या क्षणीं चालता हो.

**मधुकर**—भय्यासाहेब माफ करा, मी नानासाहेबांचा प्रतिनिधी या नात्यानं आपल्याकडे आलो आहे. आपण माझा असा अपमान करणं ह्मणजे प्रत्यक्ष नानासाहेबांचा अपमान करणं आहे. माझ्याबद्दल आपल्याला सहानभूति नसली तरी निदान नानासाहेबांची योग्यता—

**भय्यासाहेब**—बस्स ! एक शब्द बोलूं नको. मला तुझी योग्यता ठाऊक आहे. त्याचप्रमाणं नानासाहेबाचीही योग्यता ठाऊक आहे. Damn your Nanasaheb !



**आनंदराव** ( भैय्याच्या वेषांत ) :— **साहाब, जरा इष्कका प्रकार है !** (पृष्ठ—५०)

**मधुकर**—आपण माझा वाटेल तसा उपमर्द करा, पण नानासाहेबांची केलेली नालस्ती मला बिलकूल खपणार नाहीं.

**भय्यासाहेब**—ही काय मला धमकी देतोस ! पण तुझ्या दरडावणीला मी भीक घालीन असं तुला वाटतं होय ? तुझा मगरुरपणा बेमर्याद वाढत चालला आहे ! आपल्यापेक्षां वरिष्ठ दर्जाच्या लोकाशीं कसं वागावं हें मी तुला आतांच शिकवितो. मधुकर तूं ह्या पावलीं एथून चालता होतोस की नाहीं ? काय नाहीं जात ? ( त्याच्यावर हंटर उगारतो ) मग घे तर हें बक्षीस !

**मालती**—( एकदम प्रवेशून ) बाबा, हात आटोपा ! हें तुम्हीं काय माडलं आहे ?

**भय्यासाहेब**—मालती, तूं अगोदर बाजूला हो पाहूं.

**मालती**—नाहीं, बाबा मी एथून रेसभरसुद्धां हलणार नाहीं. बाबा मधुकरां-वर तुम्ही हंटर काय म्हणून उगारलांत ?

**भय्यासाहेब**—मालती, तो प्रश्न तुझा नाहीं. एवढं मात्र खात्र कीं, ह्या चाबकाच्या फटकाऱ्यानं, मगरूर मधुकरच्या उद्दाम झालेल्या मस्तकाला, मी खालीं वाकायला लावणार आहे. हा देखावा तुझ्या कोमल दृष्टीला सहन होणार नाहीं म्हणून म्हणतों तूं एथून आत जा.

**मालती**—असं काय ! आणि मधुकरांचा अपराध काय तर ते, नानासाहे-बांचे प्रतिनिधी म्हणून आपली भेट घेण्याकरतां आले हाचना ? बाबा, सगळा प्रकार मी आडून पाहिला आहे, आणि मी तुम्हांला स्पष्ट सांगतें कीं, तुमचं आतांचं वर्तन अगदीं निंद्य आहे.

**भय्यासाहेब**—मालती तोंड आटप आणि मी तुला हुकूम करतों तूं एथून चालती हो.

**मालती**—बाबा, मी तुम्हांला निक्षून सांगतें कीं मी इथून मुळींच हालणार नाहीं. तुमच्या हंटरच्या फटकाऱ्यांनीं माझ्या शरीराच्या चिंधड्या होऊन मी बेशुद्ध पडल्याशिवाय, तुम्हांला मधुकराच्या अंगाला हात लावतां येणार नाहीं हें लक्षांत ठेवा.

**भय्यासाहेब**—उद्दाम पोरी, तुझा उद्धटपणा आज बेसुमार वाढला आहे. मालती, ह्या उप्पर तूं माझा हुकूम मानला नाहींस तर ह्या क्षणीं तुला माझ्या घरां-तून निघून जावं लागेल.

**मालती**—बाबा, तुमच्या ह्या दरडावणीला मी मुळींच भीक घालीत नाहीं. काय म्हणतां, तुमचा हुकूम मी मान्य केला नाहीं तर मला ह्या घरांतून जावं लागेल इतकंच ना ? मग पहा ह्या क्षणीं तुमच्यादेखत, मी तुमच्या घरांतून बाहेर जात आहे आणि ती ह्या मधुकरांबरोबर ! !

**भय्यासाहेब**—मालती, तूं शुद्धीवर आहेस का ? तूं काय बरळतेस ह्याची तुला कल्पना आहे कां ? तुझ्या जन्मदात्याचा असा धडधडीत अपमान करतेस ! बापाची आज्ञा पाळणं हें मुलीचं कर्तव्य आहे ह्याचा तुला विसर पडला आहे असं दिसतं, किंवा मी तुझा बाप आहे ह्याची जाणीव तुला नाहीं असं वाटतं ?

**मालती**—बापाची आज्ञा पाळणं हें मुलीचं कर्तव्य आहे ह्याचा मला विसर पडला नाहीं किंवा आपण माझे वडील आहां हिही माझी आठवण बुझाली नाहीं, पण बाबा, केवळ बाप ह्या अधिकारावर आपण मला वाटेल तशी अरेरावीची आज्ञा कराल, किंवा आपण मला जन्म दिला एवढ्याच अधिकारावर मनास मानेल तसा दंडेलीचा हुकूम फर्मावाल, तर ती तुमची अरेरीवी आणि ती तुमची दंडेलशाही मी मुळींच जुमानणार नाहीं ! मुलीनं बापाची आज्ञा पाळणं हें तिचं कर्तव्य आहे हें तत्व मला मान्य आहे, पण मुलीला आज्ञा करतानां आपल्याकडून न्यायाचं नीतीचं आणि सत्याचं उल्लंघन होत नाहीं हें पाहणं बापाचें आद्य कर्तव्य आहे बाबा. मधूकरशीं तुमचं वर्तन अगदी अन्यायी होतं आणि त्याबद्दल तुम्ही त्यांची क्षमा मागितली पाहिजे.

**भय्यासाहेब**—काय ह्मणतेस मी मधूकरची क्षमा मागूं ! मालती माझा प्राण गेला तरी बेहत्तर पण ह्या भिकारड्या मधूकरची क्षमा मी मुळींच मागणार नाहीं.

**मालती**—मग बाबा मला तुमची आणि तुमच्या घराची मुळींच पर्वा नाहीं मधूकर चला मी तुमच्या बरोबर येते.

**मधूकर**—मालती आवेशाच्या भरांत भलताच अविचार करूं नको. विकाराला बळी पडून विवेकाला सोडणं केव्हाही रास्त होणार नाहीं.

पद १५. ( देशी झपताल )

**अलंकार शोभा नभाला शशीची । सुमनां ती देवा भजुनियां ॥ धृ ॥ जरि भाव भक्ति तुझ्या ठायीं होती । तरि खास यश येई या मित्र कार्या ॥ १ ॥**

तत्व पाळतांना परिस्थितीचाही विचार लक्षांत घेतला पाहिजे. उत्कट विकारानं बेभान होऊन तूं जर अशी तडक घरांतून बाहेर पडलीस तर तुला आणि मला दोघांनाही समाज दोष दिल्यावाचून राहाणार नाहीं. भय्यासाहेबांना माझी क्षमा मागण्याचं बिलकूल कारण नाहीं, त्यांना क्षमा मागण्याची असेल तर ती यांनीं नानासाहेबांची मागितली पाहिजे. मालती, ह्या उपर मी इथं थांबणं उचित नाहीं. भय्यासाहेब, आपल्याला इतकी तसदी दिली ह्याबद्दल मी आपली क्षमा मागतो. ( जातो )

**मालती**—बाबा, तुमची मुलगी तुह्मांला सोडून गेली नाहीं ह्याबद्दल जर तुह्मांला कोणाचे आभार मानयाचे असतील तर ते मधूकरांचे माना.

## अंक दुसरा समाप्त

---

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला

(हॉलं भय्यासाहेब वाचीत बसले आहेत.)

**मालती**—(प्रवेशून) बाबा, कारखान्याला आग लावण्याच्या आरोपावरून मधुकरनां पोलीसनं कैद केलं हें खरं का ?

**भय्यासाहेब**—त्या हरामखोराला मीच पोलीसच्या ताब्यांत दिलं.

**मालती**—काय तुम्हीं मधुकरनां पोलीसच्या ताब्यांत दिलं! बाबा, तुम्हीं असे कसे हो निर्दय झालांत !

**भय्यासाहेब**—मालती, त्या नीच पाजी कृतघ्न मधुकरनं प्रत्यक्ष माझ्या कारखान्याला आग लावली माझ्या कारखान्याची राखरांगोळी केली, पण तुला त्याबद्दल कांहींच वाटत नाहीं! त्याचा हा नीचपणा पाहून तूं त्याचा धिःकार करायचा तें राहून उलट त्या पाजी पशूबद्दल हळहळतेस ! मालती, तुझ्या बापाबद्दल तुझी हीच सहानुभूति काय ! तुझ्या बापाबद्दल तुझं हेंच प्रेम काय !

**मालती**—बाबा, असं काय बरं बोलतां? तुमच्या कारखान्याला आग लागून तुमच्यावर ही आपत्ती कोसळली ह्याबद्दल मला दुःख होत नाहीं असं का तुम्हांला वाटतं ! बाबा इतकी कां मी निर्दय आहे.

पद १६ (मिश्र पिलू केरवा)

**नच माया काय मला। सारी निमाली दया॥ धृ॥ संकट या परी। आप्त जनांवरी। देखुन मीन कशी उदास॥ १॥**

पण कारखान्याला आग लावण्याचा आरोप मधुकरांवर लादण्याचा निष्ठुरपणा, बाबा तुमच्या हातून कसा झाला ? बाबा, तुम्हीं हा भयंकर अन्याय केला आहे.

**भय्यासाहेब**—अन्याय ! कसला अन्याय ! मधुकरनं कारखान्याला आग लावण्याची चिथावणी दिल्याचा जय्यत पुरावा माझ्याजवळ हजर आहे. आणि ह्या भक्कम पुराव्याच्या आधारावर मालती, त्या तुझ्या बदमाश मधुकरला खडी फोडायला लावीन. त्या बेईमान मधुकरचं हें आग लावण्याचं नीच कृत्य पाहून,

माझ्या अंगाची कशी आग होत आहे, पण मालती, तुझ्या अंतःकरणांत मात्र त्या माझ्या अन्नावर पोसलेल्या काळसर्पाबद्दल दयेचे पाट फुटत आहेत.

**मालती**—बाबा, तुम्हीं कांहीं बोला, पण मधुकरांच्या हातून असं नीच कृत्य कधींहि होणार नाहीं. बाबा, ज्यांनीं चुकून देखील दुसऱ्याला दुखवलं नाहीं ते बुध्यापुरःसर असा कोणाचा घात करतील हें मला मुळींच खरं वाटत नाहीं. बाबा, मधुकरासारख्या देवगुणी माणसावर असा आरोप कसा हो घेतां!

**भय्यासाहेब**—मालती, तुझा मधुकर तुला देव वाटतो, पण मला तो मूर्तिमंत सैतान दिसत आहे!

**मालती**—बाबा, तुम्हांला ते तसे दिसत असतील, पण अशी म्हण आहे कीं, लोक आपल्या स्वतःवरून जगाची पारख करतात.

**भय्यासाहेब**—चूप बैस मालती! तुझी जीभ फार लांब होत चालली आहे. मधुकरला तूं देव समज किंवा देवांचा देव समज, पण हा तुझा देव लौकरच दगड फोडण्याच्या कामगिरीवर रवाना होईल हें ध्यानांत ठेव. मधुकरनं कारखान्याला आग लावली ह्याबद्दल माझी बालंबाल खात्री आहे.

( आनंदराव वैजनाथ प्रवेश करतात )

**आनंदराव**—मुळींच नाहीं! भय्यसाहेब, मधुकरनं आपल्या कारखान्याला आग लावली हें आपलं म्हणणं सपशेल खोटं आहे.

**भय्यासाहेब**—ह्याला पुरावा?

**आनंदराव**—( वैजनाथकडे बोट करून ) आपल्यासमोर उभा आहे,

**भय्यासाहेब**—आनंदराव हे काय कोडं आहे तें मला समजत नाहीं

**आनंदराव**—ह्या कोड्याचा उलगडा हा वैजनाथ करील. वैजनाथ खरी हकीगत भय्यासाहेबांना सांग.

**भय्यासाहेब**—ही काय भानगड आहे! मधुकरनं कारखान्याला आग लावली असं वैजनाथ तूंच मला सांगितलंना?

**वैजनाथ**—साहेब, माफ करा. तें मीं अगदीं खोटं सांगितलं

**भय्यासाहेब**—पण खोटं सांगण्याचं कारण?

**आनंदराव**—( वैजनाथाचा कबुलीजबाब पुढं करून ) कारण हें! कृष्णरावानं वैजनाथला कचाट्यांत पकडून त्याच्याकडून ह्या साऱ्या कारस्थानाची उभारणी केली आहे.

**भय्यासाहेब**—मग कारखान्याला आग कोणीं लावली ?

**आनंदराव**—प्रत्यक्ष कृष्णरावानं !

**भय्यासाहेब**—काय ? कृष्णरावानं कारखान्याला आग लावली ! आणि मधुकर ?

**आनंदराव**—पूर्ण निर्दोषी आहे.

**मालती**—बाबा, आतां तरी माझ्या म्हणण्याची सत्यता तुम्हांला पटली ना ?

**भय्यासाहेब**—माझं डोकं फिरून जाण्याच्या बेतांत आलं आहे. पण तो हरामखोर कृष्णराव कोठें आहे ?

**आनंदराव**—त्याचीच भेट आपल्याला आतां घेतली पाहिजे. आणि त्याच्या स्वागताकरितां पोलिस अंमलदारही घेतले पाहिजेत. भय्यासाहेब, निरपराधी मधुकरची सुटका करायची असेल, आणि कृष्णरावाला पकडायचं असेल, तर ह्या वजनाथाला घेऊन पोलिस स्टेशनकडे तडक चला मला मात्र आपल्याबरोबर येतां येत नाहीं, पण मी आपल्या सावजाच्या पाळतीवर आहे.

---

## प्रवेश २ रा

( रस्ता, आनंदराव प्रवेश करितो )

**आनंदराव**—माझ्या प्रयत्नाला यश येऊन मधुकरची सुटका होणार, ह्याबद्दल मला आनंद होत आहेच, पण तारेजवळ केलेली प्रतिज्ञा मला सिद्धीस नेतां आली याबद्दल खरोखरच अभिमान वाटतो. आज इतक्या दिवसांत तारेची भेट न झाल्यामुळं, तिचं दर्शन केव्हां घडतं असं झालं आहे, पण कांहीं वेळ मोह आवरुन धरला पाहिजे. मधुकरची सुटका झाल्याशिवाय तोंड दाखविणार नाहीं अशी मीं तारेजवळ प्रतिज्ञा केली आहे, आणि याकरितां मधुकरची मुक्तता होईपर्यंत मला थांबलंच पाहिजे. तारे, माझ्या प्रेमाची साक्ष तुला पटली आहे, पण लौकरच माझ्या हृदयाचीही साक्ष तुला पटेल, आणि तारे तुझी खात्री होईल, कीं आनंदराव नुसता एक आनंदी वृत्तीचा रंगेल प्राणी नसून प्रसंग पडल्यास मित्र कार्यासाठीं तो कोणत्याही संकटाशीं तोंड देण्याला तयार होईल.

पद १७

सुधामय कोमला भाव। ॥ धृ ॥ हास्य मधुरतर उधळी जातां । हंसती अवचिया रानकोकिळा ॥ १ ॥ दील फुलांचा सरता झाला । आणि आली ऐशी वेळा ॥ २ ॥

( जातो विश्वनाथ प्रवेश करतो. )

**विश्वनाथ**—कृष्णरावांच्या नीच कारस्थानाची बातमी मी आनंदरावाला दिली असतां तो अद्यापि स्वस्थ कां बसला आहे ? मधूकराची सुटका. त्यानं केव्हांच करायला पाहिजे होती. त्या निरपराधी मधुकराबद्दल माझं अंतःकरण अगदीं तळमळत आहे. मीच जाऊन पोलिसला वर्दी देऊं का ? पण मी बोलून चालून वेडा ! माझ्यावर कोण विश्वास ठेवणार ? आणि आता मी शंभर टक्के शहाणा आहे असं जरी शपथेवर सांगितलं. तरी कोणाला खरं वाटणार नाहीं. उलट वेड्याच्या हास्पितळांत माझी तावडतोब रवानगी करतील. काय मौज आहे पहा ! शहाण्या माणसाला वेडेपणाचे वाटेल तसे चाळे करायला अगदीं मुबलक मुभा ! पण माझ्यासारख्या वेड्याला एकादेवेळीं शहाणपणाचं प्रदर्शन करण्याची लहर आलीं, तर मुळींच सोय नाहीं. जाऊं द्या. हरी ठेवील तैसेंचि रहावं ! पण सगुणा कुठं दोन दिवसांत आली नाहीं ! वेडी तर झाली नाहीं ! पण ती मुळचीच वेडी आहे, म्हणूनच माझ्यासारख्या वेड्याच्या नादाला लागली आहे. खरंच, दोन दिवसांत त्या पोरीला पाहिलं नाहीं, तर अगदीं चुकल्यासारखं वाटत आहे. सगुणा कांहीं संकटांत तर सांपडली नसेलना ?

**सगुणा**—[ प्रवेशून ] बाबा,मी आतां काय करूं हो ? काय करावं तें मला, सुचत नाहीं. मी अगदीं बावरून गेलें आहें. बाबा, सांगाना काय करूं तें ? ( विश्वनाथ तिच्याकडे वेड्यासारखा पहात असतो ) बाबा असे नुसतें माझ्याकडे पाहतां काय ? मी काय प्रसंगांत, आणि तुह्मी तर कांहींच बोलत नाहीं !

**विश्वनाथ**—पण वेडे पोरी, कोणता प्रसंग तुझ्यावर ओढवला आहे तें तर तूं कांहीं सांगत नाहींस. मग मी बोलूं काय ? कपाळ !

**सगुणा**—माझे घरधनी कृष्णरावांच्या बंगल्यांत एकाएकीं फार आजारी झाले आहेत, कांहींतरी भयंकर अपघात त्यांना झाला आहे, आणि त्यामुळे कृष्ण-रावानं मला तातडीनं तिकडे बोलावलं आहे.

विश्वनाथ—काय ! कृष्णरावनं आपल्या बंगल्यांत तुला बोलावलं आहे ?

सगुणा—अगदीं निकडीचा निरोप धाडला आहे. हा कृष्णरावचा कपटी कावा आहे कीं काय अशी मला भीति वाटते ! एक मन सांगतं कीं जावं, पण दुसरं मन सांगतं कीं कांहीं तरी धोका आहे. बाबा काय करावं तें सुचत नाहीं. मी कशी अगदीं गांगरून गेले आहे. मग बाबा मी जाऊं का ?

विश्वनाथ—जा. खुशाल जा. कांहीं काळजी करूं नको.

सगुणा—पण बाबा, जर कांहीं बरावाईट प्रसंग माझ्यावर आला तर माझं रक्षण करण्यासाठीं देव धांवून येईल कां ?

विश्वनाथ—वेडयासारखा कांहींतरी प्रश्न विचारलास ! सगुणे, आपल्या माणसांना सगळ्यांचीं सुखदुःखें पाहण्याला कुठं वेळ असतो ! देवाचंहि तसंच. यांच्या बहाल मर्जीतील मंडळीकडेच तो धांव घेणार.

सगुणा—बाबा ! परमेश्वर असा पक्षपात कसा बरं करील ? त्याला सारे भक्त सारखेच नाहींत का ?

विश्वनाथ—सारेच भक्त सारखे कसे असतील ! देवाच्या नांवानं नुसत्या झांका आरोळ्या मारीत बसल्यानं काय भक्तपणा येतो ? काशीपासून रामेश्वरापर्यंत लांबीचे गंधाचे पट्टे कपाळावर ओढून आणि देवावर दूर्वांचे आणि फुलांचे मनोरे रचून काय भक्तगिरीची वतनदारी मिळते ? सगुणे, भगवंताचा भक्त होण्याला प्राणिमात्राबद्दल अंतःकरणांत दया दाटावी लागते. तापलेल्या वाळवंटावर तळमळत पडलेल्या महाराच्या पोराला हृदयाशीं कवटाळून धरणारं एकनाथी अंतःकरण असावं लागतं. बरं जाऊं दे, आणि सगळ्याच भक्तांकडे धांव घेण्याला देवाला तरी टाईम पाहिजे ना ? अग, आपल्या माणसांच्याच मागें. किती व्याप आणि व्यवसाय, शिवाय नाटकं आणि सिनेमांनीं तर काय कहर करून सोडला आहे ! त्यामुळें त्यांना क्षुल्लक कामं करायला वेळसुद्धां मिळत नाहीं ! आपल्या भूलोकावर जर ही स्थिती, तर देवलोकांत काय गहजब झाला असेल, ह्याची कल्पना कर. शिवाय कालीदासापासून तों गडकऱ्यापर्यंत सारे नामांकित नाटककार तिथें; मग नाटकांची तर नुसती दंगल उडाली असेल ! ह्या मंडळींची नाटकं पाहण्यांतच देवाचा सारा वेळ जात असेल !

सगुणा—बाबा, कांहींतरी तुम्हीं बोलतां. देव असा कुठं आपल्या माणसांसारखा नाटक पाहायला जातो ?



**विश्वनाथ** :—चांडाळा, हे तुझे अपराध आणि हें त्याचं प्रायश्चित्त ! ( पृष्ठ ५४ )

**विश्वनाथ**—अग, देव तर नटांचा नट, आणि नाटककारांचा नाटककार! त्याला तर नाटकाशिवाय क्षणभर चैन पडत नाहीं! जगाच्या रंगभूमीवर त्याचे नाट्यप्रयोग अहोरात्र चालू आहेत! बरं पण तुझ्यावर प्रसंग आला तर तुझं रक्षण करण्यासाठीं देव धांवून येईल का, असा प्रश्न तूं विचारलास नाहीं कां? सगुणे! तुझ्यासारख्या पावित्र्याच्या पुतळीचं, तो अनाथांचा आधार, गरीबांचा वाली, द्रौपदीमाईचं संकट निवारण करणारा तो दिनानाथ, खात्रीनें रक्षण करील.

**सगुणा**—माझे देव, बाबा, तुम्हींच!

**पद १८**

**हरिणीस नाहीं कोणी वणव्यांत तारणारा तो ॥ ध्रु०॥**

**ममता ती तातवाणी। भगवंत तूंच माझा ॥ १ ॥**

देवा जर माझ्यावर कांहीं वेडावाकडा प्रसंग आला, तर ह्या आपल्या गरीब मुलीची अब्रू सांभाळण्यासाठीं धांवून याल ना?

**विश्वनाथ**—उठ. बेटा, ऊठ. अगदीं भिऊं नको. ह्या विश्वनाथाच्या देहांत प्राण आहे, तोंपर्यंत कृष्णरावाचीच काय, पण काळाच्या काळाचीही तुझ्याकडे वांकड्या नजरेनं पाहाण्याची मगदूर नाहीं—जा, ईश्वर तुझं कल्याण करो!

(सगुणा जाते.)

---

## प्रवेश ३ रा

(हॉल. कृष्णराव आणि आनंदराव भय्याच्या वेषांत)

**कृष्णराव**—भय्या, आतां इथं एक बाई येईल, आणि ती आपल्या नवऱ्याबद्दल विचारपूस करील, तिला तावडतोब आंत पाठवून दे. समजलास!

**भय्या**—अगर साहाब, बाईका मर्द इदर नहीं, और बाईकूं अंदर कैसा भेजनेका?

**कृष्णराव**—मूर्ख आहेस अगदीं! तुला कांहीं कळत नाहीं; आणि त्या बाईचा नवरा एथे आहे किंवा नाहीं ही पंचाईत तुला कशाला? हुकुमाची अम्मलबजावणी करायची, इतकंच तुझं काम. समजलास!

**भय्या**—कसूर माफ करना साहेब.

**कृष्णराव**—( स्वागत ) ह्या आडदांड प्राण्याला आपल्या इंगिताचा थोडा इषारा दिला पाहिजे. (उघड) भय्या, हें पहा, ती बाई वैजनाथची बायको आहे, आणि वैजनाथ फार बेमार होऊन पडला आहे ह्मणून ती अगदीं लगबगीनं इकडे येईल. अगदीं खूपसुरत औरत आहे ! आणि हें पहा भय्या, ही जरा नाजूक कामगिरी आहे; कोणाला कळतां उपयोगी नाहीं. ही कामगिरी जर तूं बरोबर बजावलीस, तर त्याबद्दल जादा बक्षीस मिळेल. मी काय ह्मणतों तें आलं ध्यानांत ?

**भय्या**—साहब अबी बराबर ध्यानमें आगया. जरा इष्कका प्रकार हैय !

**कृष्णराव**—शाबास ! कामगिरीबद्दल हा थोडासा आगाऊ मेहनताना ( एक नोट देतो ) काम फत्ते झालं, कीं आणखी बक्षीस मिळेलच. सगुणा, वैजनाथाच्या बायकोचं नांव, समजलास ! आली कीं तिला एकदम माझ्या खोलीत पाठवायची. आलं ध्यानांत ! ( जातो )

**भय्या**—कृष्णराव, तुझं बदफैली कारस्थान माझ्या पुरं ध्यानांत आलं आहे, पण तुझी शेवटची घटका भरत आली आहे हें मात्र तुझ्या ध्यानांत नाहीं. भय्यासाहेबांना पोलीसला वर्दी देण्याला मी सांगितलं आहेच, ते पोलीसला घेऊन इतक्यांत येतीलच. म्हणजे हा कृष्णराव किती बेडर बदमाश आहे ह्याबद्दल आपोआपच त्यांची खात्री होईल. वा ! माझा वेष तर इतका बेमालूम साधला आहे कीं, ह्यानं मला ओळखलं सुद्धां नाहीं ! दाढीमिशांची ही हिंदुस्तानी ऐट और आहे ! छबी कशी रुबाबदार दिसते ! हिंदीभाषाही तशीच. बोलणाराला कसं अगदीं आपण कांहीं तरी ठणठणीत दणदणीत बोलत आहो असं वाटतं. शाळा आणि कॉलेज सोडल्यापासून नाट्यकलेची सेवा करण्याची संधी अद्यापपर्यंत मिळाली नव्हती, त्यामुळं कसं अगदीं चुकल्यासारखं वाटत होतं. पण मधूकरवरील संकटामुळं मला ह्या नटवेषांत अवतीर्ण होण्याचा योग आला आहे. अरे, पण ही कोण बाई घाई घाईनं इथं येत आहे ? वैजनाथची बायको सगुणाच वाटते !

**सगुणा**—( प्रवेश करून ) कुठं आहेत हो माझे घरधनी ? त्यांना काय झालं आहे हो ?

**भय्या**—तुमारा नाम क्या है बाई ?

**सगुणा**—सगुणा. पण माझे घरधनी कुठं आहेत ? मला त्यांच्याकडे न्या ना अगोदर ?

**भय्या**—बाई, घबरना नहीं. ऐसा अंदर जाना. ( सगुणा आंत जाते. ) भय्यासाहेब अजून पोलीसला घेऊन कसे येत नाहींत ? ह्या गरीब गाईचं रक्षण करण्याकरितां, मला इथं राहिलंच पाहिजे. दुसरा कोणी विश्वासू मनुष्य मिळाला असता तर, त्याला इथं ठेवून मी असाच जाऊन पोलीसला घेऊन आलों असतों. पण आतां ह्या घटकेला असा विश्वासू मनुष्य कोण मिळणार ? (विश्वनाथ येतो.) ( कोण विश्वनाथ ? ) कौन है, क्या मंगता है ?

**विश्वनाथ**—साहेब, तुमच्या आवाजावरून मी तुम्हांला ओळखलं आहे, मग आतां उगाच सोंगाची बतावणी कां करतां ? साहेब, सगुणा इथं आली आहे काय ?

**भय्या**—होय, आणि म्हणूनच मला तुझी मदत पाहिजे.चल. ऐन वेळीं आंत प्रवेश कसा करायचा तें मी तुला सांगतों. ( दोघेही जातात. ) ( सगुणा व कृष्णराव प्रवेश करतात. )

**सगुणा**—( इकडे तिकडे पाहत ) कुठं आहेत माझे घरधनी ? त्यांना जबर दुखापत होऊन ते बेशुद्ध स्थितींत पडले आहेत,म्हणून मी इथं धावत आलें, पण ते तर इथं दिसत नाहींत.कुठं आहेत हो ते ? सांगाना ! आणि तुम्हीं असे माझ्याकडे पाहून हंसतां काय ?

**कृष्णराव**—सगुणे, अशी घाबरूं नको. तुझा घरधनी वैजनाथ खुशाल आहे, ह्याबद्दल कांहीं काळजी करूं नको.

**सगुणा**—मग त्याना जबर दुखापत झाली आहे ही बातमी खोटीच आहे ना ? बरं, मी जाते आतां !

**कृष्णराव**—सगुणे, चाललीस कुठं ? तुला इकडे बोलावून आणिलें, ती अशी तुला परत जाऊं देण्याकरितां का ? आणि हें पहा,तुझ्या घरधन्याकरितांच तूं धांवून आलीस ना ? मग ह्या घराचा धनी मी आहें. आतां हें घर तुझंच आहे असें समज, म्हणजे झालं !

**सगुणा**—हें पहा, असली भलतीसलती थट्टा मला सहन व्हायची नाहीं बरं कां !

**कृष्णराव**—सगुणे, थट्टेनं मी मुळींच ह्मणत नाहीं, अगदीं खरोखर सांगतों. हें घर तुझंच समज.

**सगुणा**—आपलं घर आपल्याला लखलाभ असो. माझी वाट सोडा पाहूं !

**कृष्णराव**—सगुणे, तुझ्या वाटेकडे आज मी किती महिने डोळे लावून बसलों आहें, आणि आतां तूं आल्यावर तुला सोडूं होय ? तुला इकडे आणण्यासाठीं मला हा खोटा डाव खेळावा लागला, पण ह्याला कारण तुझं हें सौंदर्य ! सगुणे, तुझ्या सौंदर्याच्या जादूनं हा कृष्णराव तुझा दास झाला आहे. प्यारी, अशी जवळ ये. ( तिच्याजवळ जाऊं लागतो. )

**सगुणा**—हं ! खबरदार जवळ याल तर ! कृष्णराव, तुम्हीं मला कोण समजतां ? मी एकादी बाजारबसवी आहें अशी तुमची कल्पना आहे का ? आम्हीं गरीब बाया बापड्या म्हणजे तुम्हां श्रीमंतांच्या प्रेमाचीं खेळणीं आहोंत असं कां तुम्हांला वाटतं ? कृष्णराव, जरी मी गरीब आहें, तरी माझी अब्रू मला माझ्या जिवापेक्षां प्यार आहे. तसाच प्रसंग आला तर, प्राणाचं मोल देऊन माझ्या शीलाचं मी रक्षण करीन.

**कृष्णराव**—सगुणे, काय वेडगळ कल्पना तूं कवटाळून बसली आहेस ? अग कसली अब्रू आणि कसलं शील ! या नीति अनीतीच्या कल्पना आता अगदीं जुन्या झाल्या आहेत. आजची फॅशन उद्यां रहात नाहीं. बदलत्या काळाबरोबर जसा फॅशनचा रंग बदलतो त्याचप्रमाणं नव्या परिस्थितींत नीति अनीतीच्या कल्पनेंतही कांहीं नवी नवाई पाहिजे. सगुणे, या जुन्या पुराण्या नीतीच्या नादाला लागून तूं आपल्या नाजूक नवतीची माती का करून घेतेस ! सगुणे, माझ्या प्रेमाचा स्वीकार कर, तुझ्यावर अलंकाराची खैरात करीन. त्या तुझ्या भिकार नवऱ्याच्या सहवासात तुझी कोणती हौस पुरणार ?

**सगुणा**—हं खबरदार ! माझ्या पतीबद्दल कांहीं वेडं वाकडं बोलाल तर ! कृष्णराव, पतिव्रता आपलं शील राखण्यासाठीं अलम दुनियेच्या दौलतीवर लाथ मारील ! चला, माझी वाट सोडा.

**कृष्णराव**—सगुणे, बऱ्या बोलानं ऐक, आणि माझ्या विनंतीला मान दे, नाहीं तर—

**सगुणा**—नाहीं तर काय ?

**कृष्णराव**—नाहींतर कोणत्याही मार्गानं माझा हा हेतु सिद्धीस नेण्याचा माझा ठाम निश्चय झाला आहे. सगुणे, असा निकडीचा प्रसंग तूं स्वतःवर ओढवून घेणार नाहींस. गोडीगुलाबीनं सौदा पटविण्यांत मजा आहे हें कळण्याइतकी तूं खास समजूतदार आहेस ! प्यारी, उगाच माझा अंत कां पाहतेस ? तुझ्या सौंदर्यानं वेडावून गेलेल्या ह्या तुझ्या दासावर दया कर. तुझ्यापुढं आलेल्या ह्या प्रेमाच्या ताटाला—

**सगुणा**—मी अशी लाथाडून टाकतें ! कृष्णराव, कसलाही प्रसंग आला तरी माझ्या अब्रूचं रक्षण करण्याला मी समर्थ आहे !

**कृष्णराव**—सगुणे, कुणाच्या हिंमतीवर तूं आपल्या अब्रूचं रक्षण करणार ?

**सगुणा**—परमेश्वराच्या ! तो दीनांचा तारक, पतितांचा पालक, तो दीनानाथ माझ्या सहाय्याला धांवून येईल !

**कृष्णराव**—असं काय ! सगुणे, पाहतों आतां कोण तुझ्या सहाय्याला धांवून येतो तो ? कोण तुझा दिनानाथ कीं विश्वनाथ—

**विश्वनाथ**—( प्रवेशून ) होय विश्वनाथ !

**सगुणा**—कोण, बाबा ! माझ्या देवा !

**कृष्णराव**—कोण हा ! वेडा विश्वनाथ !

**विश्वनाथ**—होय विश्वनाथच. पण आतां वेडा नाहीं ! माझ्या वेडेपणाचा अवतार संपला ! आणि त्याबरोबर तुझ्याही अवताराची समाप्ती होणार ! ( पिस्तूल रोखतो. )

**कृष्णराव**—( स्वगत ) हा वेडा माझा प्राण घेणार कीं काय ? [ उघड ] धांवा ! खून, खून ! भय्या, धावा!

**विश्वनाथ**—खबरदार ओरडलास तर ! चल आटप. देवाचं नांव घ्यायचं असेल, तर घेऊन टाक.

**कृष्णराव**—अरे पण तुझा असा अपराध तरी मी काय केला आहे ? आणि तूं कोण ?

**विश्वनाथ**—मी कोण ? पहा नीट डोळे उघडून पहा. नाहीं ओळख पटत अजून ? मग ऐक मी कोण तो ? कांहीं वर्षांपूर्वी त्या तुझ्या कारखान्यांत काम करणारी एक मैना नांवाची तरुण स्त्री होती. असा दचकूं नको, तुझी कसाबकरणी नीट

ऐक. हरामखोरा, तुझी पापी कामवासना तृप्त करण्याठीं, तूं तिच्या अब्रूची होळी करण्याला तयार झालास ! आणि तुझ्या नीच कामवासनेच्या होमांत तिच्या शीलाची आहुति घेण्यास तयार झालास ! आणि तुझ्यासारख्या नराधमाच्या पकडींत सापडलेल्या त्या साध्वीला आपलं शील राखण्यासाठीं स्वतःच्या प्राणाची आहुति द्यावी लागली ! अब्रूसाठीं प्राणाचं बलिदान करणारी ती मैना माझी बायको. माझ्या सच्छील साध्वी पत्नीचा बळी घेणाऱ्या आणि माझ्या जीविताची राखरांगोळी करणाऱ्या नरराक्षसा, मी कोण हें आता तरी समजलास ! माझ्या संसाराची राखरांगोळी केलीसच, आणि आता माझ्या ह्या मानलेल्या मुलीच्या अब्रूवर निखोर ठेवण्याला तयार झालास! आणिअपराध काय केला म्हणून विचारतोस ? नीच चाडाळा, हे तुझे अपराध आणि हें त्याचं प्रायश्चित्त ! ( पिस्तुल झाडतो. कृष्णराव विव्हळत खालीं पडतो. इतक्यात भय्यासाहेब, पोलीस व आनंदाव प्रवेश करतात. )

**पोलीस ऑफिसर**—हें काय ! हा तर खून झालेला दिसतो ! कोणीं केला हा खून ?

**विश्वनाथ**—मीच साहेब. दुसऱ्या कुणाची हिंमत होणार ? काय करणार साहेब ! आपल्याला येण्याला उशीर झाला,त्यामुळं ही कामगिरी मला पार पाडावी लागली ! पण आपली बरीचशी मेहनेत मीं वाचविली आहे. अपराधाची चौकशी आणि लगलीच शिक्षा ! आणि ती शिक्षा अशी कीं, तिच्यावर पुन्हां अपील म्हणून नाहीं ! सगळा एकदमच निकाल लावून टाकला !

**पोलिस ऑफिसर**—पण आतां खुनाच्या आरोपावरून तुला गिरफदार करावं लागेल हें लक्षांत आहे का ?

**विश्वनाथ**—आणि त्याबद्दल मला मरणाची शिक्षा भोगावी लागेल हें सुद्ध ठाऊक आहे साहेब ! पण हें काय ? अरे बापरे ! केवढा आगीचा डोंब हा ! (सर्वजण आग कुठं लागली तें पाहातात इतक्यांत विश्वनाथ स्वतःवर गोळी झाडून घेतो. )

## अंक तिसरा समाप्त.

# अंक चौथा



## प्रवेश १ ला.

( हॉल—तारा सचिंत बसली आहे.)

**तारा**—आज पांच सहा दिवस झाले, पण आनंदरावांचा पत्ताच नाहीं. त्य आनंदमूर्तीचं दर्शन न झाल्यामुळं माझ्या मनाला कशी अगदीं हुरहुर लागली आहे ! त्या दिवशीं वेळीं अवेळीं थट्टा करणाऱ्या स्वभावाबद्दल मी त्यांचा धिःकार केल्यामुळं, स्वारीचा इतका राग झालेला दिसतो. आनंदराव खरोखर मनापासून इतके रागावतील अशी माझी कल्पना सुद्धां नव्हती. आनंदराव घरीं सुद्धां नाहींत, मग ते जावेत कुठं ? नाहीं नाहीं त्या कल्पना माझ्या मनांत येतात ! मला कुठून दुर्बुद्धि झाली, आणि त्या दिवशीं मी त्यांना असं टाकून बोललें ? मधुकर असते, तर आनंदरावांचा शोध त्यांनीं खास केला असता. पण ते बिचारे तसे संकटांत पडलेले ! आनंदराव मधुकरना सोडविण्याच्या खटपटींत तर गुंतले नाहींत ? हो, मधूकरचं संकट दूर करीन तेव्हाच तुला तोंड दाखवीन असंच ते बोलले होते. ह्मणूनच ते इकडे आले नाहींत. प्रतिज्ञा पार पाडण्याचा विचार दिसत आहे स्वारीचा ! पण ते स्वतःच्या घरीं सुद्धां कसे नाहींत ? ते स्वतःच कांहीं संकटांत तर नाहींना पडले ? देवा, माझ्या आनंदकंदाला माझ्या जिवाच्या जिवलगाल —सुखी ठेव.

**मालती**—( प्रवेशून ) कोणाकरितां देवाची इतक्या कळवळ्यानं प्रार्थना चालली आहे ?

**तारा**—मालतीच्या मधुकरांसाठीं बर कां ! मालतीच्या मधुकराचं संकट दूर व्हावं, ह्मणून देवाची प्रार्थना करीत होतें.

**मालती**—मग तारे, देव खरोखरच तुझ्या प्रार्थनेला पावला. मधुकराचं संकट दूर झालं.

पद १९ ( बागेश्री त्रिताल )

**सानंदे वासंति बुल बुल गात । हळुवार घेती तान्ना ॥ धृ ॥**
**प्रणय विकासी कोमल भावा । कमल विकसलें पाहीं आतां ॥ १ ॥**

तारा—अहाहा ! हें ऐकून मला किती आनंद झाला आहे !

मालती—तुला असा आनंद होईल म्हणूनच ही गोड बातमी सांगण्याकरितां मी तुझ्याकडे आलें. कारखान्याला आग लावण्याचा मधुकरांवर घातलेला आरोप अगदीं खोटा आहे अशी बाबांची बालंबाल खात्री पटली, आणि ते मधुकरांची सुटका करण्याकरितां गेले आहेत. हें सारं नीच कारस्थान त्या कृष्णरावचं. पण ह्या कारस्थानाचा तलास कोणीं लावला ते तुला ठाऊक आहे का ?

तारा—सांग सांग, कोणीं लावला ?

मालती—अग आनंदरावानं !

तारा—काय आनंदरावनं ! खरोखरच ह्या कारस्थानाचा तलास आनंदरावानं लावला ?

मालती—हो हो ! तुझ्या आनंदरावानं लावला बर का ?

तारा—इश्श ! ही काय तुझी भलतीच थट्टा !

मालती—अग थट्टा कसली ? खरं आहे तेंच बोलतें.

तारा—आनंदरावनं मधुकरांना संकटांतून मुक्त केलं हें ऐकून मला खरोखरच धन्यता वाटते. मालती, आनंदराव अगदीं सुखरूप आहेत ना ?

मालती—अगदीं सुखरूप आहेत अग, ते आजच आमच्याकडे आले होते. ही भलतीच शंका तुझ्या मनांत कां येते ?

तारा—आज पांच सहा दिवस आनंदराव अगदीं नापत्ता झाले होते. त्यामुळं मला कसं अगदीं सुचेनासं झालं होतं ! पण तुझ्या ह्या बातमीनं मला किती समाधान वाटत आहे म्हणून सांगू ! आतां मात्र परमेश्वर माझ्या प्रार्थनेला खरोखर पावला. मालती, क्षमा कर. मी तुझ्याजवळ खोटं बोललें, मी मघाशीं देवाची विनवणी करीत होतें ती—

मालती—तुझ्या आनंदरावासाठीं, असंच ना ? देवाचा धांवा इतक्या जिवाभावानं जिवाच्या माणसांसाठींच चालला होता तर मग !

तारा—मालती, आज मला आनंदरावची खरी योग्यता कळली. आनंदराव म्हणजे निव्वळ विनोदी वृत्तीचे आनंदी प्राणी अशी माझी समजूत होती, परंतु आजच्या त्यांच्या कामगिरीवरून आनंदराव मित्रकार्यासाठीं—( मधुकर नाना साहेब व भय्यासाहेब प्रवेश करतात )

**मधुकर**—प्राणाचीही पर्वा करणार नाहींत अशी ह्या मधुकरची वाणी तुह्मांला ग्वाही देत आहे !

पद २० ( भैरवी त्रिताल )

**सुमनांतिल पुष्परसाला। जरि माधुरि गोडीला। तिचिया ना तुला ॥ध्रु०॥ भ्रमरा न ठावा। दुजा कांहीं बरवा। आदेश हाही भ्रमरा न ठावा साधी मरणाचि जो स्वतांचें ॥ १ ॥**

**नानासाहेब**—खरोखर, तारे, मधुकर संकटांतून पार पडले ह्याचं सारं श्रेय आनंदरावांनाच आहे.

**तारा**—पण आनंदराव आहेत कुठं ?

**आनंदराव**—( भय्याचा वेष झुगारून ) Your most obedient servant madam आपल्या सेवेला इथंच हजर आहे ! तारे माझी प्रतिज्ञा पार पडल्याबद्दल मला आनंद वाटतो. आतां तरी माझ्या हृदयाची साक्ष पटली ना ?

**तारा**—आपल्या हृदयाची साक्ष, आपण येण्यापूर्वीच माल्तीनं मला पटवून दिली होती.

**आनंदराव**—प्रिय जनांचं स्वागत करण्याकरतां मालतीबाई, आपण इथं अगोदरच दाखल झाला वाटतं ?

**मधुकर**—आनंदराव, हा तुझा तर्क चुकीचा आहे. मी इथं येणार हें माल्तीला कशावरून माहीत ?

**आनंदराव**—मधुकर, तुला प्रेमशास्त्राची कांहींच माहिती नाहीं. अरे, प्रणयी जीवांचे संदेश न बोल्तांच परस्परांना कळतात ! आणि प्रेमी जीव अशी कांहीं मौज करतात, कीं कांहीं विचारूं नको. एकादे वेळीं कारणावांचून हंसतात, आणि एकादेवेळी कारणावांचून रागावतात.

**तारा**—मग हृदयाची साक्ष हृदयाला पटल्यावर रागाचा अनुरागच होतो !

**नानासाहेब**—आनंदराव, तारे, तुह्मांला परस्परांच्या हृदयाची साक्ष पटल्यावर तुह्मीं आतां एकमेकांपासून दोन हात दूर असणं बरं नाहीं. हृदयांचं मीलन झाल्यावर हातांचही मीलन झालंच पाहिजे. ( तारेचा हात आनंदरावाच्या हातांत देतो ) भय्यासाहेब, तुह्मांलाही अशीच एक गोड कामगिरी करावी लागेल.

**भय्यासाहेब**—ती कामगिरी मी करणारच, पण अगोदर मला दुसरी एक कामगिरी करायची आहे, आणि ती म्हणजे नानासाहेब, आपली क्षमा मागायची. आपली मजुरांच्या सुधारणेची योजना घेऊन मधुकर माझ्याकडे आला, तेव्हां मी त्याच्याबरोबर आपलाही उपमर्द केला, त्यावेळीं माझ्या डोळ्यांवर सावकारीचा माद चढला होता. माझ्या डोळ्यांवर श्रीमंतीची धुंदी चढली होती ! नानासाहेब, आतां माझ्या डोळ्यांत झणझणीत अंजन पडून, मला माझ्या कृत्याचा पूर्ण पश्चात्ताप झाला आहे, आणि माझ्या हातून घडलेल्या आगळिकीबद्दल, मी आपली मनोभावानं क्षमा मागतों. मजूर वर्गांबद्दल सावकारांनीं सहानुभूति दाखविली पाहिजे, हें आपलं आणि मधुकरचं तत्व मला आतां पटलं. आजपासून नानासाहेब मी सावकारीं बाणा सोडून देऊन आपल्या आणि मधुकरच्या सहकारी तत्वाचं अवलंबन करण्याचा निश्चय केला आहे, आणि माझ्या निश्चयाची साक्ष म्हणून मधुकर, माझ्या मालतीचा हात तुझ्या हातांत देत आहें.

**नानासाहेब**—आज आपल्या सर्वांचं हें मधु-मीलन पाहून मला फारच आनंद होत आहे. आतां ज्या दयाघनाच्या कृपेनं आजचा हा मधु-मीलनाचा मंगल दिन आपल्याला प्राप्त झाला, त्या प्रभूची आपण मनोभावानं प्रार्थना करूं या.



मुंबई सरकारच्या शिक्षणखात्यानें लायब्ऱ्याकरितां
व बक्षिस पुस्तक म्हणून मंजूर केलेलें

# विनोद-मंजूषा

( विनोदी लेख )

## किंमत १ रुपया

लेखक:—श्री. वा. रा. टिपणीस

प्रस्तावना लेखक:—प्रि. गो. चि. भाटे, एम्. ए.

केसरी, ज्ञानप्रकाश, नवजीवन, मनोरंजन, मौज
इत्यादि वृत्तपत्रांचे अनुकूल अभिप्राय


पुस्तकें खालील ठिकाणीं मिळतील

परचुरे पुराणीक आणि मंडळी,
माधवबाग, मुंबई.

समर्थ बुक डेपो,
गिरगांव, मुंबई.